# बाळा जो जो रे

महाराष्ट्रांत विनोदी लेखक म्हणून सुप्रसिद्ध असलेले कॅप्टन गो. गं. लिमये यांच्या चार कथांचा संग्रह मराठी भाषेच्या पाळण्यांत टाकण्याचा व त्याला झोले देऊन पहिली ओवी म्हणण्याचा मान आज माझ्या वांट्यास आला आहे. पहिलें मूल झालें म्हणजे आईला जो आनंद होतो तो अपूर्व असतो यांत शंका नाहीं. त्यामुळें पहिल्या मुलाचें बारसें आप्तेष्टमित्र–मैत्रिणींना बोलावून मोठ्या थाटामाटानें साजरें करतात ही गोष्ट खरी. परंतु मातृत्वाची नवलाई संपली तरी पुत्र वा कन्या जन्माचा आनंद केव्हांहि मनाला होणारच. मग तो कितवा का प्रसंग असेना! मात्र पहिल्या मुलाच्या बारशाला जी मंगल कार्याची दंगल उडते तशी पुढें प्रत्येक प्रसंगीं गाजणें शक्य नसते. जुन्या ओळखीच्या एखाद्या शेजारणीला घरीं बोलावून नाममात्र समारंभानें मुलाचें नामकरण करण्याची प्रवृत्ति वाढत जाते. थाटामाटाचा समारंभ न करतां औपचारिक विधि तेवढा कसाबसा उरकण्यांत येतो. विशेषतः मुलीच्या बाबतींत समारंभाची काटाछाट करण्यांत येते. आणि हे विनोदी लेख नसून केवळ **कथा** आहेत. पुत्रजन्माचा आनंद सनातन्यांपासून तों नवमतवाद्यांपर्यंत कोणीच नाकबूल करत नाहीं. कारण नवमतवाद्यांना प्रसंगीं विवाहाची शृंखला समाजस्थैर्याला अनवश्यक वाटत असली तरी मातृत्वाची भावना स्वाभाविक आनंदमय असल्यामुळें तिला ते आदरपूर्वक आपली मान तुकवितात. ' स्त्री ही क्षणाची पत्नी परंतु अनंतकालाचीं माता आहे ' ही घोषणा प्रि. अत्रे यांनीं देखील केली आहे. सामान्यांना जें सत्य पटतें तें डाक्टरांना पटणारच. कारण पुत्रजन्मोत्सव–निरीक्षणाचे प्रसंग धंद्यामुळें त्यांना अधिक लाभलेले असतात. मानवी सृष्टींतील भावनांची मनोमय व मनोरम नक्कल वाङ्मय-सृष्टींतील कल्पनामय दालनांत अनुभवतां येते, या गोष्टीची ग्वाही महाराष्ट्रांतील कर्नल कीर्तिकरापासून तों कॅप्टन लिमयापर्यंतचे अनेक वैद्यविद्याविशारद मोठ्या आनंदानें देतील.

सामान्यतः मराठी लेखकांचा शास्त्रीय जगताशीं परिचय फारसा नसतोच व त्यांचें जीवनहि मळलेल्या चाकोरींतून आपला मार्ग काढत असते. कॅप्टन लिमये हे डॉक्टर आहेत व गेल्या महायुद्धांत प्रत्यक्ष भाग घेतल्यानें त्यांची दृष्टिहि फाकली आहे. त्यामुळें संसारांत घडणाऱ्या प्रत्येक प्रसंगाच्या मागें जो मनोव्यापारांचा खेळ प्रेक्षकांना दिसत नसतांहि चालला असतो त्याचे धागेदोरे हुडकण्यांत ते कुशल आहेत. धंद्यामुळें स्वाभाविक त्यांची मनोविश्लेषणात्मक प्रवृत्ति बनली आहे आणि तिचा प्रत्यवाय या गोष्टी वाचतांना वाचकांना पदोपदीं पटतो.

मानवी मनाला महासागराचीच उपमा देतां येईल. त्यांत अमोल मोत्यें सांपडतील, परंतु डामडौलाच्या अलंकाराशिवाय त्यांचा जीवनांत काय उपयोग ? त्या समुद्राच्या पाण्यांत किमतीनें क्षुद्र परंतु जीवनाच्या दृष्टीनें रसपूर्ण मीठहि सांपडतें. ह्या समुद्रांत निरुपद्रवी मत्स्य आहेत आणि भयंकर मगरहि आहेत. सागराचें स्वरूप कधीं तलावाप्रमाणें शांत तर कधीं पावसाळी ओढ्याप्रमाणें तुफानी भासतें. पाणबुड्या समुद्राचा ठाव घेऊन त्याचें सत्य स्वरूप सांगूं शकतो. त्याप्रमाणें एखादा शास्त्रज्ञच मानवी मनाचें यथातथ्य चित्र रेखाटूं शकेल. तो चित्रकार असला तर कुंचली व रंगांचा उपयोग करील आणि लेखक असला तर शब्दांच्या जादूनें तें चित्र दृष्टीसमोर उभें करील.

कॅ. लिमये यांच्या चारी कथा दुःखान्त आहेत. पहिल्या दोन कथांनीं लघुकथांची मर्यादा उल्लंघन केली आहे. आधुनिक कथालेखनाचें जें तंत्र निर्माण झालें आहे व ज्याचा बराच गाजावाजा करण्यांत येतो त्या तंत्रांत त्यांची 'विरक्ति कीं भित्रेपणा ' ही कथा फार तर जाऊन बसेल. बाकीच्या तिघींनीं तंत्राचें यंत्र झुगारून दिलें असून मनोव्यापारांच्या पृथक्करणाचा मंत्र म्हटला आहे. संसारांत कोणताहि सुखदुःखाचा प्रसंग प्राप्त झाला म्हणजे प्रत्येक व्यक्तीच्या मनांत जी विचारविकारांची गर्दी उद्भवते व जीं आंदोलनें निर्माण होतात त्यांचें मार्मिक शब्दचित्र या कथांत पहावयास सांपडतें.

या कथांत अद्भुतता नाहीं, त्यामुळें त्या वाचतांना अंगावरील केंस ताठ उभें राहत नाहींत. कल्पनेला धक्के देणारे प्रसंग त्या कथांत गुंफलेले नाहींत त्यामुळें त्या वाचून वाचकांच्या मनोवृत्ति भडकण्याचा मुळींच संभव नाहीं. लेखक कॅप्टन असला तरी लढवय्या वीर शिपाईगडी नसून शास्त्रज्ञ डॉक्टर आहे. लेखक जखमा करणारा नसून जखमी इसमाच्या जखमा शिवणारा आहे. त्यामुळें त्या

कथा घरगुती वळणाच्या व संसारांतील चतुर्विध प्रसंग रंगविणाऱ्या आहेत. वास्तवतेच्या दृष्टीनें त्या उत्कृष्ट साधल्या आहेत. ' तोफेच्या तोंडीं ' या कथेंतील अनुभव सामान्य महाराष्ट्र वाचकाच्या परिस्थिती बाहेरचा असला तरी त्यामुळें त्या कथेचें वास्तववादी स्वरूप नष्ट होत नाहीं. सरहद्दीवरील लष्करी जीवनाशीं परिचित असणारा इसम तिचें सत्य स्वरूप तेव्हांच ओळखूं शकेल.

' मेलेली आठवण ' व ' तोफेच्या तोंडीं ' या दोन कथांना आधारभूत असणाऱ्या मध्यवर्ती कल्पना डॉक्टर लेखकाला सहज सुचणाऱ्या आहेत. त्यांचें वातावरण डॉक्टरी धंद्याचें आहे. ' अयोग्य निवड ' व ' विरक्ति कीं भित्रेपणा ' या कथांतील घटनाप्रसंग मध्यम वर्गांतील महाराष्ट्र कुटुंबांच्या आधुनिक सामाजिक इतिहासांतून स्फुरलेले आहेत. सुंदर मैना हवी वाटली तरी तिचे जीवन सुखानें जाईल अशी प्रथम तजवीज करूनच माणसानें तिचा लोभ धरावा, नाहींपेक्षां खुशाल कोकिळेबरोबर काळ कंठावा. गाणारी मैना पाळावयाची व तिचें गाणें बंद करावयाचें, असा विरोधाभासाचा अलंकार एरवीं माणसाच्या आयुष्यांत निर्माण होईल. संसार सुखदुःखमिश्रित असतो या सत्याची जाणीव ठेवूनच संसारांत माणसानें पडलें पाहिजे, नाहींपेक्षां पत्नीच्या बाळंतपणाच्या वेदना पाहूनच पतिराज घाबरून संन्यास घ्यावयाचे आणि पुत्रजन्मोत्सवाच्या आनंददायक सोहाळ्यास नेमके मुकावयाचे. गृहस्थाश्रमी गृहस्थाला वनवास घडावयाचा आणि संन्याशाला मुलेंबाळें व्हावयाचीं. मानवी मनाची नौका भडकूं न देण्यांतच नावाड्याचें खरें कौशल्य आहे. त्याखेरीज ती इष्ट अशा आधुनिक मुक्कामाला कशी जाऊन पोहोंचणार ?

कॅप्टन लिमये यांचें आधुनिक साहित्यिक जगताशीं फारसें संघटण असलेलें दिसत नाहीं. त्यांची मनोवृत्ति एकांतवासप्रिय आहे. त्यामुळें त्यांच्या कथारचनाशैलींत थोडी सैलता उत्पन्न झाली आहे.

त्यांची भाषाहि साधीसुधी घरगुती वळणाची भासते. मुंबईत राहूनहि मुंबईचा नट्टापट्टा तिला शिकतां आला नाहीं. कोंकणांत मादकता वाढली आणि मुंबईतून दारूचें उच्चाटण होऊन ती सोवळी झाली, असा अद्भुत चमत्कार कॅप्टन लिमयांच्या भाषेंत पहावयास सांपडतो.

जग दुःखमय आहे अशी त्यांची भावना झाली असल्याचा भास या कथा वाचून वाचकाला होतो. दुःखाच्या पोटांत दडलेलें सौख्य हुडकण्याची मार्मिक

दृष्टि असणाऱ्या रसिकाला मात्र तें दिसूं शकेल. तो वरपांगीच्या शोकाला फसणार नाहीं व अनीतीच्या जाळ्यांत सांपडणार नाहीं. या दुःखान्त कथा वाचूनहि सूज्ञ व समंजस वाचकाला आनंद होईल आणि तो कॅप्टन लिमयांना खात्रीनें धन्यवाद देईल असें आश्वासन मी त्यांना मोठ्या आनंदानें देतों. कारण लहान मुलांप्रमाणें मोठ्या माणसांनाहि झोले आवडतात आणि मानवी मनांतील विचारविकारांचीं आंदोलनें त्याच्या मनाला मोह पाडतात. या कथांत हेलकावे असले तरी हिसके खास नाहींत आणि मेघांच्या तरंगत्या छाया असल्या तरी वादळी घनदाट अंधकार पडलेला नाहीं. आक्टोबरच्या उन्हापेक्षां असें अर्धवट छायामय आकाश कोणालाहि अधिक रुचेल.

महाराष्ट्रांतील रसिक वाचकवर्गाला कॅप्टन लिमयांचें हें नवें वाङ्मयापत्य आवडेल असा मला विश्वास आहे. मुलीला पाळण्यांत टाकून चार झोले देण्याचा व आशीर्वाद शुभ चिंतन करण्याचा शेजारधर्म मला कळतो व तोच मी पाळला आहे.

मुंबई
ता. ९-१०-१९३८

नारायण केशव बेहेरे

# मेलेली आठवण

ती आठवण मी कधींही विसरणार नाहीं. तें दृश्य अजून माझ्या दृष्टीसमोर जसंच्या तसं दिसत आहे. कशाला ?—गेल्या ५ वर्षांतील कितीतरी गोष्टी माझ्या स्मृतींत जशाच्या तशा कायम आहेत. पण त्या आठवणी ताज्या असल्या–त्या गोष्टी आतां माझ्यासमोर घडताहेत असं वाटलं तरी माझ्या भावना कांहीं त्या त्या परिस्थित्यनुरूप आतां बदलत नाहींत. माझी मनःस्थिति आतां स्थिरावली आहे. कशाचं दुःख होत नाहीं, कशाचा आनंद होत नाहीं, कशाची भीति म्हणून वाटत नाहीं. मनांत कसलीच भावना नुरल्यामुळें माझं मन आतां तारकाविहीन आकाशासारखं पोकळ झालं आहे. आणि म्हणूनच जगाच्या दृष्टीनें मी वेडी असेन. कदाचित् असं असेल; सात रंगांचं चाक हळूं हळूं फिरवलं म्हणजे त्यांतला प्रत्येक रंग ओळीनं आपल्याला दिसतो, तेंच गर्कन फिरवलं म्हणजे साती रंग एकमेकांत मिसळून जाऊन चाक कोरं करकरीत दिसतं. माझ्या मनांत कदाचित् निरनिराळ्या विचारांचा हलकल्लोळ उडाल्यामुळें त्यांतला एकच विचार प्रबल आहेसा न दिसतां माझं मन भावनाशून्य–त्या चाकासारखं दिसत असेल. काय गम्मत आहे पहा. ‘ सुखदुःखे समीकृत्वा ’ वगैरे गीतेंत कित्ता म्हणून पुढें ठेविलेली आदर्शभूत मनःस्थिती झाल्यामुळंच मी म्हणे वेडी. व्यवहारांत अशा माणसाला कोणीही वेडं ठरवील. जगाच्या दृष्टीनं शहाणी कोण, तर लवकर लुगडं विटलं म्हणजे जिला दुःख होतं व नथेंत भर घातली म्हणजे

जिला आनंद होतो; मुलाला गोंवर आला म्हणून जी घाबरून जाते व शेजारणीनं आपल्यापेक्षां सुंदर रुमाल विणला म्हणून जिला हेवा वाटतो, दूध उतू जाऊं दिलं म्हणजे जिला राग येतो व स्वयंपाक चांगला झाला आहे म्हटलं म्हणजे जिला तसं म्हणणाऱ्याबद्दल लोभ वाटतो, ती. माझ्यासारखी सुखदुःख समान मानणारी नव्हे. सुख-दुःख सारखें मानणारी तीच वेडी.

असं म्हणावं तर लोकांच्या बोलांत तरी बोल कुठं आहे ? भावनातिरेक झाला तरी त्याला ते वेडंच ठरवितात. कष्टानं गांजलेल्या मनुष्यानं आत्महत्या करून सुटका करून घेतली तरी त्यांच्या अंगांत पण वेडाचं वारं भरलं होतं असं म्हणतात. सांगण्याचं तात्पर्य—मी वेडी असो, कीं शहाणी असो, इतकं खरं कीं नवऱ्यानं टाकल्याचं आतां मला दुःख नाहीं किंवा जवळ केली तरी त्याचा आनंद नाहीं. आत्महत्या करण्याचं मला भय वाटत नाहीं किंवा अशीहि उत्कंठा नाहीं कीं केव्हां एकदां जीव देईन.

हल्लीं मी ज्या ठिकाणीं आहें तें ठिकाण कांहींनीं पाहिलं असेल, ज्यांनीं एकदां पाहिलं आहे त्यांचं मन तें दुसऱ्यांदा पहायला धजणार नाहीं. ज्यांनीं मुळींच पाहिलं नसेल त्यांनीं तें पहाण्याच्या भानगडींत पडूं नये. ह्या ठिकाणचं वातावरण असं आहे कीं तें पाहिलें तर त्यांत पडण्याची इच्छा होते, आपोआप नकळत तशी इच्छा होते,—त्यांत मनुष्य आपोआप तादात्म्य पावतो.

येथें नाना तऱ्हेचे लोक तुम्हांला दिसतील, उत्कट भावनामय किंवा अगदीं भावनाशून्य, सोनें आणि माती सारखे मानणारे किंवा पैशाला मोहोर समजून त्याला जिवापलीकडे संभाळणारे. कांहीं अत्यंत

भिडस्त तर कांहीं तुमच्या अंगलटीस येणारे. मी देखील यांपैकींच कोणत्या तरी एका तऱ्हेची असेन !

मसाला पेरलेल्या ' ममी 'प्रमाणं माझ्या भावना मेल्या असल्या तरी आठवणी ताज्या भासतात. नरकचतुर्दशीच्या आदले दिवसाची गोष्ट. संध्याकाळ झाली होती. पहिल्याच दिवाळसणाकरतां आज गांवाहून यायचं होतं. म्हणून भाऊ म्हणाला कीं चल आपण स्टेशनच्या वाटेला फिरायला जाऊं. स्टेशन लांब होतं. वाटेंत मोटार भेटली कीं येऊं मोटारीनंच सगळे परत. मला तेंच हवं होतं. मी तिकडे पहायला उत्सुक झालेली होते. भाऊनींच आईला विचारलं व आम्ही दोघे हळूहळू रमत गमत चाललों. वाट आमच्या पायाखालचीच होती. कारण तेवढाच एक रस्ता फिरायला जाण्यासारखा होता, व आम्ही नेहमीं त्या बाजूला फिरायला जात असूं.

माझं मन अवर्णनीय हर्षातिरेकानं उचंबळून आलं होतं. मी अगदीं ऐटींत होते. ऐट तर करावयाची पण केली आहे असं दिसूं द्यायचं नाहीं असा विचार करून मी एक जुनंच पण चांगलं लुगडं नेसलें, अंगांत धारवाडी खणाची चोळी घातली व बुचड्यांत वाटेंतलि बागें-तून तोडून एकच गुलाबाचं पांढरं फूल खोवलं आणि मला वाटलं, मी अगदीं खुलून दिसत असेन. माझ्या हातांत गोठ पाटल्या आणि बांगड्या असल्यामुळें हात कसा भरून दिसत होता. लग्नांत मिळालेली आंगठी आणि सल्ले पण बोटांत होते. मी मधूनच त्या झळकणाऱ्या बोटाकडे पाही व आंगठी झळकलेली पाहिली म्हणजे मला गम्मत वाटे.

आईबापांनीं माझ्या तितक्या लहानपणीं किती हौसेनं लग्न लावून दिलं. आणि सासरच्या मंडळींनीं पण तिकडच्यांचं तसंच केलं असेल.

पुढें असा प्रकार होणार हें त्यांना माहीत असतं तर ? त्यांनीं माझ्याशीं लग्न केलं असतं का ? पुढचं भविष्य मला आधीं कळतं तर मी लग्नाला उभी राहिली असते कां ? पण तिकडेही कुणीं विचारलें नाहीं. आणि मला पण कोणीं विचारलं नाहीं आणि आमच्यापैकीं कोणींच नाहीं म्हटलं नाहीं. आम्हांला लग्नाची गम्मतच वाटत होती.

खरं म्हटलं तर माझ्या मनांत कुणालाही दोष लावावयाचा नाहीं. त्या त्या वेळीं मला तसं तसं वाटे पण ती चूक होती. सगळ्या गोष्टी यदृच्छेनं सहजासहजीं होतात. हरबरे भिजत घातले म्हणजे ते साहजिकच पाणी शोषतात, पाणी शोषल्यामुळें अर्थात् फुगतात आणि मग उबारा लागल्या मुळें आपोआप त्याला मोड येतात. दुसरे हरभरे असतात ते सांडतात, आपण बाहेर फरशीवर फेंकून देतों व ऊन लागलें तर ते वाळून त्याचा भुगा होतो किंवा दमट हवेंत कुजून जातात. जे हरभरे सांडले ते जाणून बुजून अक्कलहुशारींत का खालीं पडले ? नाहीं. यदृच्छेनें ज्या हरबऱ्यांना भिजत घातल्यामुळं आतां मोड आले आहेत, त्यांपैकींच जर एकादा तसाच चुकून खालीं पडला असता तर तोही कुजला असता किंवा वाळला असता. ज्याला जशी परिस्थिति भेटते तसा तो बनत जातो. पाण्याच्या प्रचंड प्रवाहांत सांपडलेला साधारण मनुष्य ओघाबरोबर वाहत जाणारच. अगदीं अट्टल पोहणारा व विशेष शक्तिवान् असला तरच तरेल. तसंच साधारण बुद्धीचा व साधारण मनाचा मनुष्य—जसा आपल्याला साधारणपणें आजूबाजूला दिसतो—तो त्या साधारण पोहतां येणाऱ्या मनुष्यासारखा किंवा त्या हरबऱ्या-सारखा, जगांत चांगल्या—वाईट गोष्टी नेहमीं तशा साधारण मनुष्याला भेटतात. व ज्याला जशी भेटेल तसा तो होतो. पण अलौकिक

हिंमतीचा मनुष्य त्या गोष्टीच खाकेंत मारून आपली ठरविलेली वाट चालूं लागतो. अशा साधारण मनुष्याला आपण 'चांगला' असें म्हणतो. परिस्थित्यनुरूप जर साधारण मनुष्य बदलला तर त्याला चांगलेंही म्हणतां येणार नाहीं, वाईटही म्हणतां येणार नाहीं, म्हणून मी त्यांना दोष देत नाहीं. किंवा—तसंच म्हटलं तर-त्यांच्या जिवावर उठल्याबद्दल मी स्वतःही पापी ठरत नाहीं. एकीकडून खरा दोष त्या बाईचा. पण तीही बिचारी परिस्थितीची सावली. तीही ' साधारण ' मुलगीच ! तेव्हां जें आहे तें आहे, तसंच असायचं आणि तसंच व्हायचं, असं आपण धरून चाललं पाहिजे. माझ्या या कहाणीपैकीं ते ती आणि मी यांच्याऐवजीं दुसरं जरी कोणी साधारण मनुष्य असतं तरी त्या त्या परिस्थितींत त्यांचं त्यांचं तसंच झालं असतं. आरसा हलवला म्हणजे जसा कवडसा बदलतो.

तर आम्ही मोटार भेटेपर्यंत स्टेशनच्या वाटेला चाललों होतों. दिवाळी जरी सगळ्यांचाच सण आहे, तरी मला वाटूं लागलें कीं प्रत्येक नव्या जोडप्याला पहिला दिवाळसण लवकर उपभोगितां यावा म्हणूनच दर वर्षाला दिवाळी येते. पूर्वी लग्नाच्या आधीं दिवाळी म्हणजे परब्रह्म वाटे पण आतां तर त्याच्याही पलीकडचें कांहीं वाटूं लागलें. इतकेंच वाटून राहिलें नाहीं तर असाही विचार आला कीं कुवारणींना दिवाळींत कसली आली आहे मजा ! त्यांच्या इथं का दिवाळसण आहे का तसं कुणीं यायचं आहे. आतां फटाक्यांत गंमत होती पण तितकी नव्हती.

पुष्कळ वाट चाललों पण मोटार भेटेना. शेवटीं मी दमलें व

आमच्या नेहमींच्या झाडीखालील पुलाच्या भिंतीवर बसलें. भाऊ तसाच आणखी पुढें निघाला.

पुलावर बसून अनेक सुखद विचार करीत असतां वेळ भर्रकन जाऊं लागला, व अजून मोटार येईना म्हणून कंटाळवाणें वाटूं लागलें. तिनीसांजा झाल्या. मधुनच उठून व रस्त्यावर जाऊन मी लांब वळणावर पाही. शेवटीं कंटाळून मी परतण्याचा निश्चय केला. कारण भाऊही येईना, अंधार पडूं लागला आणि मी एकटी. मला तशी भीति मुळींच वाटत नव्हती, पण आई रागावेल म्हणून शेवटचीं पांच मिनिटें थांबून निघण्याचें मीं ठरविलें. मला जागृतावस्थेंतच स्वप्न पडल्यासारखें झालें. लवकर यायचं झालं नाहीं म्हणून मी जशी कांहीं खोटीच पण रागावलें आहें व तिकडून माझी समजूत करणं होत आहे. त्यांनीं माझ्या खांद्यावर एक हात ठेवून दुसऱ्या हातानं माझा एक हात धरला आहे पण मी त्यांना बळेंच दूर लोटीत आहें—

इतक्यांत माझ्या खांद्यावर कोणी जड हात ठेवला व माझा डावा हात जोरानें पकडला !

मी त्या माझ्या सुखस्वप्नांत इतकी तल्लीन झालें होतें कीं प्रथम मी शुद्धीवरच नव्हतें. त्यांनींच खरोखर हात ठेवला असें मला वाटलें असेल.

आतां बराच अंधेर पडला होता व मी बसलें होतें तेथें रस्त्याच्या दुतर्फा गर्द झाडी असल्यामुळें अगदींच काळोख होता. रस्त्यावर चीटपाखरूंही नव्हतें.

निमिषार्धांत मी भानावर आलें. माझ्या अंगाला दरदरून घाम सुटला. लागलीच मीं वळून पाहिलें. अंधेरांत तोंडाला तोंड दिसण्याची मारामार होती. पण त्याच क्षणीं कुठून तरी एकदम वीज

चमकल्यासारखा तेजःपुंज उजेड क्षणमात्रच माझ्या डाव्या अंगावरून गेला. त्या उजेडांत मला काय दिसलें ? एक गोंदलेला गोरा हात!.... तें दृश्य पाहून मी भीतीनें एक कर्कश किंकाळीं फोडली ! एकाएकी तो उजेड नाहींसा झाला. आत्मसंरक्षणाच्या नैसर्गिक स्फूर्तीनें मी तो हात जोरानें मागें ढकलला, व पटकन् पुलाच्या भिंतीवरून उडी टाकून धूम पळत सुटले, हातपाय लटलट कांपत होते, पण तशीच मी जोर करून धांवूं लागलें. मला पुरतें भय वाटण्यास अवकाशच नव्हता. शेवटीं थकून विठा महारणीच्या झोंपडीजवळ मी जाऊन थांबलें. तेव्हां मी अधिकच घाबरलें. सुदैवानें मला तेथें कोणीं पाहिलें नाहीं. सुदैवानें—कारण आतां भिण्याचें कारण नव्हतें व कोणीं पाहिलें असतें तर बभ्रा मात्र झाला असता. तेथून आमच्या घरापर्यंत जाण्यास शेतांतूनच पण सरळ अशी वाट होती. त्या वाटेनें मी घरीं येऊन पोहोंचलें. संकट जरी आतां टळलें होतें, तरी माझी छाती धाडधाड उडत होती, व अंगावरील घाम वाळून आतां थंडी वाजूं लागली होती, माझी दांतखिळीही वाजूं लागली होती. माझं तोंड पांढरंफटीक पडलं होतं. कपडे अस्ताव्यस्त झाले होते. व गुलाबाचं फूल कसं तरी लोंबकळत होतं. त्यावेळीं या सर्व गोष्टी माझ्या मला समजल्या नव्हत्या पण मला पाहून आईनं तसे उद्गार काढले.

मी अद्याप भीतीनें गांगरून गेलें होतें. तो प्रकाश पडतांच मला जें दृश्य दिसलें तें अजून माझ्या डोळ्यांसमोर लख्ख दिसत होतें. जों जों तें घालविण्याचा प्रयत्न करी तों तों, मलीन झालेला शिलालेख जसा पुसावा तसं तें जास्त जास्तच स्पष्ट उमटूं लागलं. तो प्रकार असा होता कीं माझ्या तोंडानं त्याचा उच्चार करणं शक्य नव्हतं.

जरी त्यांत माझा दोष नव्हता तरी झालेली हकीकत सांगण्याचा मला धीर होईना. आपल्याच हातून कांहीं भयंकर पाप घडलें आहे असेंच मला--खोटेंच—वाटूं लागलें. व तें सांगण्याची शरम वाटूं लागली. तें त्यांना कळलें तर काय वाटेल ? त्यांना देखील तो एक प्रकारचा कमीपणाच वाटेल. तेव्हां उगीच त्यांना कशाला कळूं द्या! शिवाय तें भयंकर दृश्य पाहून मला उगीचच अशीही भीति वाटत होती कीं, मी जर कोणाला ही गोष्ट सांगितली तर माझं कांहीं तरी वाईट होईल; म्हणून मी झाला प्रकार कोणालाच न कळविण्याचा निश्चय केला.

पण त्याच वेळीं तें मनांतील किल्मिष ओकून टाकलं असतं तर त्यानं पुढें आयत्या वेळीं माझा घात केला नसता. तें गुपित मनांत तसंच कोंडलं गेलं व भलत्याच वेळीं वाव मिळून तें बाहेर पडलं.

माझी पुष्कळ विचारपूस केली. पण मी कांहींच बोलेना. मी संध्याकाळची वडापिंपळाखालून गेल्यामुळें हिला दृष्ट लागली असावी असा आईनं तर्क केला व लागलीच मीठ मोहऱ्यांनीं मला ओवाळलं. मला थंडी वाजून येत आहे इतकेंच मीं म्हटलें. नंतर मला पांघरूण घालून आईनं निजविली.

त्या रात्रीं मी त्यांच्याशीं कांहींही बोलण्यास धजलें नाहीं. त्यांना वाटलें मला मलेरियाचा ताप भरला आहे. कारण खरोखरच माझें अंग आतां कढत झालें होतें. मला जेवण सुचेना. सारखें तें भयंकर दृश्य डोळ्यापुढें दिसे. तो जड खांद्यावर टाकलेला गोंदलेला हात, तो अवचित पडलेला प्रकाश आणि त्या प्रकाशांत जें कांहीं मला दिसलें तें.

खरें पाहिलें तर मला आतां काय होत होतें ? मी अगदीं माहेरच्या पदरांत, पतीच्या आसऱ्याला होतें. आतां कसली भीति नव्हती.

आई-बाबांना, राजाभाऊला व तिकडे वाईट वाटेल म्हणून मी झालेली हकीगत सांगितली नव्हती. पण आतां त्या गोष्टीचें काय होतें ? अशा गोष्टी कांहीं रोज होणार नाहींत. मग मला कसली भीति वाटत होती ? तें दृश्य डोळ्यापुढून कां हालत नव्हतें ? अजूनही मोठी किंकाळी फोडावी असें मला कां होत होतं ? तें मला सांगतां येत नाहीं. एकदां वाटे सांगून मन मोकळें करावें, पण आधीं सांगितलं नाहीं, आतां कसं सांगावं; मघांच सांगितलं असतं तरी हरकत नव्हती, असं दर घटकेस मला वाटूं लागलं. शेवटीं विचार करतां करतांच मला झोंप आली असावी.

दिवाळसणाला येतांना त्यांनीं मला गळ्यांत घालायचा साज आणला होता. माझी थोरली बहीण सासरहून आधीं दोन दिवस आलेली होती. भाऊ कॉलेजला सुट्टी असल्यामुळें होताच. त्याच्या बरोबर वादविवाद करण्यांत, बहिणीशीं सुखदु:खाच्या गोष्टी बोलण्यांत आणि त्या साजाच्या नादांत मी ती गोष्ट दोन–चार दिवसांत विसरून गेलें. आणि पुढें लागलीच जेव्हां बाबांची त्या गांवाहून बदली झाली तेव्हां तर ती गोष्ट माझ्या मनाला पुन्हा केव्हां शिवलीही नाहीं. मनाला चटका लावणाऱ्या पण क्षणिक अशा किती तरी लहानपणच्या गोष्टी आपण पार विसरतों.

* * *

मूल जसं रांगत रांगत चेंडूमागें जातं आणि धप्दिशीं जोत्यावरून खालीं पडतं, पण चेंडू मात्र जोत्याच्या खांबाला अडकून वरच राहतो, तसं माझं झालं. सूड उगविण्याच्या उत्कट इच्छेनं मी त्यांच्या मागोमाग त्यांना धरायला गेलें पण माझाच डाव फसून ते मात्र शाबूत राहिले.

मला टाकली ती काय मी वेडी होतें म्हणून? कुरूप होतें म्हणून? खेडवळ होतें म्हणून? गरीबाची होतें म्हणून? कोण जाणे! तसं असतं—यांपैकीं एकही कमीपणा कोणांत असता तर—आज जगांतल्या बहुतेक नवऱ्यांना बायका टाकाव्या लागल्या असत्या. बायको टाकून तसाच-म्हणजे दुसरं लग्न न करतां सन्मार्गानं राहणारा मनुष्य कोठें आहे? मग म्हटलं असतं कीं बायकोच वाईट. पण बायको म्हणजे कांहीं बदाम नव्हेत, कीं एक कडू लागला कीं थुंकून टाकला. कारण पुष्कळ बदाम असतात व तेही हाताशीं. लग्न म्हणजे कांहीं रोज करण्याची गोष्ट नव्हे. एकादी आवडीनं घेतलेली बहुमोल वस्तु कांहीं कारणानं नावडूं लागली तरी मनुष्य सहसा टाकीत नाहीं. टाकील पण दुसरी मिळण्याची आशा असली तर—किंवा आधीं पासूनच दुसरी आवडूं लागली असली तर.

तसंच कांहीं अंशीं तिकडचं झालं. कारण कोणचीही बायको अशी काय वाईट असूं शकणार कीं नवऱ्यानं टाकावी? करून घेतांना बोटं सुद्धां मोजून घेतलेलीं असतात, आणि स्वभावांत वाटेल तितका कमीपणा असला तरी असा किती व कोणता कमीपणा असणार कीं त्यामुळें बायको टाकली पाहिजे—अगदीं वाऱ्याला सुद्धां नको! थोडे बहुत गुणदोष प्रत्येकींत असणारच. एकादी कंजुष असेल, एकादी उलटून बोलणारी असेल. अशी कोणती सकलगुणालंकृत बायको कोणाला मिळाली आहे? आणि असल्या क्षुल्लक कारणावरून जर लोक बायको टाकूं लागले, तर लग्नांना मुहूर्त पुरेनासे होतील. कारण प्रत्येकींत कमीपणा जसा असावयाचाच तशी एकीपेक्षां दुसरी एकादी अधिक चांगली मुलगी असावयाचीच. म्हणजे काय लागलीच पहिली टाकून ती दुसरी करावयाची!

बायको म्हणजे काय कुत्रें? कुलंगी सांपडलें कीं गांवठी टाकून द्यावयाचें, किंवा लूत भरली तर नदीपलीकडे नेऊन सोडावयाचें!

रोज भाजी बिघडली म्हणून काय बायको टाकली आहे कोणीं? आईचं नीट केलं नाहीं म्हणून बायको टाकायची? चहा फार पिते म्हणून टाकायची? सांगितलेलं ऐकलं नाहीं म्हणून टाकायची? असाच कांहीं तरी अक्षम्य अपराध घडला पाहिजे कीं जो जाणून बुजून केला व जो निस्तरणें शक्य नाहीं. जाणता मुलगा पुष्कळ चुका करतो, म्हणून का त्याला घराबाहेर घालवायचा? तसंच त्याच्या हातून कांहीं विशेष—भयंकर स्वरूपाचं घडलं तरच तें शोभेल. मी तर म्हणतें तिनं जाणून बुजून वांकडं पाऊल टाकलं तरच नवऱ्याला टाकायला अधिकार आहे. एवढं एकच सबळ व योग्य कारण मला दिसतं. मूल झालं नाहीं तर लोक दुसरं लग्न करतात पण पहिलीला टाकीत नाहींत. मी असं म्हटलं कीं बायको जर वाईट चालीची निघाली तरच तिला टाकायचा नवऱ्याला अधिकार पोहोंचतो. पण आपल्याला आज या जगांत काय दिसतं? तर याच्या अगदीं उलट. म्हणजे नवराच बाहेरख्याली झाला—तोच भ्रष्ट झाला—कोणाच्या नादीं लागला कीं बायको टाकतो. असे किती तरी लोक आज समाजांत प्रतिष्ठितपणें वागत आहेत! माझ्या-मतें त्यांचा अपराध शतपटीनं वाढतो. एक तर भलतीच्या नादीं लागले म्हणून; व बिचाऱ्या बायकोला टाकली म्हणून. तत्त्वाकरतां जातिभेद मोडणारे, विधवांची कींव आल्यामुळं पुनर्विवाह करणारे, अगर विला-यतेस जाऊन आलेले, अशा लोकांना वाळींत टाकण्यापेक्षां या बायका टाकणाऱ्या लोकांना वाळींत टाकण्याचं कसं कोणाच्या मनांत येत नाहीं?

पण आतां मला असं वाटत नाहीं हो. कारण असे लोक म्हणजे खरं म्हटलं तर वेडेच. किंवा लहान मुलाप्रमाणें अपरिपक्व बुद्धीचे. त्यांनाही समाजांत मिसळून दिलं पाहिजे, त्यांना आंजारून गोंजारून शिकवलं पाहिजे. लहान मुलाला मोठ्या माणसांत कधींच येऊं दिलं नाहीं तर त्याला तरी चार लोकांत कसं वागावं, हें कसं समजणार, व आपल्या चुका समजून तो शहाणा कसा होणार ?

माझ्या बाबतींतही असंच झालं. मी रूपानें ' टाकाऊ ' निदान नव्हतें. माझ्या मैत्रिणींना उलट माझ्या रुपाचा हेवा वाटे. ' तुझा गोड चेहरा पाहिला म्हणजे माझे श्रम हलके होतात ' असं तिकडे नेहमीं म्हणायचं. मी श्रीमंताची, लक्षाधिशाची नसलें तरी काहीं अगदीं गरीबाची नव्हतें. बी. ए. झालेली नसलें तरी व्यवहारोपयोगी लिहितां वाचतां येण्याइतकी शिकलें होतें. त्या मानानं माझं वय तितकंच होतं. मग माझ्यांत कमीपणा—अगदीं टाकण्याइतका कमीपणा—कोणचा दिसला ? कदाचित् एकादा मला माहीत नाहीं किंवा लक्षांत आला नाहीं असा असेलही. पण विचारल्यावरदेखील त्यांनीं तो मला कधीं सांगितलेला नाहीं. इतकं खरं कीं माझ्यांत कमीपणा होता—तो येवढाच कीं—मी त्यांची झालेली होतें ! एकादी चांगली वस्तु पाहिली कीं ती हवीशी वाटते. त्याकरतां मनुष्य जीव टाकतो. तीच वस्तु एकदां आपलीशी झाली कीं उतरली तिची किंमत. प्रथम त्या वस्तूंतील आकर्षक भाग तेवढा दिसतो, व त्या मानानें दोष आपण दृष्टीआड करतों. पण पुढें दोषैकदृष्टिच बनते. पैसे खर्चून नाटक शेवटचा पडदा पडेपर्यंत पाहून ' काय रद्दी नाटक ' असें आपण नेहमीं म्हणतों. चांगल्या गोष्टीचाही—फार झालें कीं—कंटाळा येऊं

लागतो. आमचं जर लग्न झालं नसतं—कायद्यानं जर ते माझे धनी—स्वामी—मालक झाले नसते व आमची आज तिऱ्हाइत म्हणून गांठ पडली असती तर खात्रीनं त्यांना मी हवीशी वाटूं लागलें असतें. बाजारांत मांडलेल्या खेळण्याची जी किंमत असते ती कांहीं तें खेळणं घरीं आल्यावर रहात नाहीं. तें कोठें तरी कोंपऱ्यांत पडून रहातं. व दुकानांतील दुसऱ्या खेळण्याकरतां मूल नेहमीं हट्ट घेऊन बसतें. हा साधारण माणसाचा स्वभावच आहे. म्हणून मी कोणालाच दोष देत नाहीं.

'प्रेम-विवाह' यामुळेंच पुढें दोघानांही दुःखकारक होतात. त्यांनीं देखील आतां प्रेमविवाहच केला आहे. आमचा विवाह काय द्वेषबुद्धीनं प्रेरित होऊन केला होता? खुद्द स्वतः मला पाहायला येऊनच ना मला पसंत केली? आमचें लग्न ठरल्यापासूनच ना आमच्या दोघांच्याही मनांत एकमेकांबद्दल प्रेम उत्पन्न झालें? हें एक प्रकारें प्रथमदर्शनी प्रेमच नव्हे का? मग हा एकप्रकारें प्रेमविवाहच ना? आमच्यापैकीं एकाच्या जरी मनाविरुद्ध लग्न झालं असतं—व लग्न लागल्यामुळें नंतर प्रेम उत्पन्न झालं असतं—तर कदाचित् कधीं काळीं त्या प्रसंगाची आठवण होऊन मनाला रुखरुख लागणं शक्य होतं. पण आमच्या बाबतींत तसंही नव्हतं. तेव्हां मनच विकृत म्हटलं पाहिजे, दुसरं काय?

मला दिवाळसणांत साज आणायचा झाला तो काय द्वेषाची खूण म्हणून? मी आजारी असतां माझ्या उशाशीं वर्तमानपत्र वाचीत जागत बसायचं असे, तें काय वाचनाची भयंकर आवड म्हणून? चांदण्या रात्रीं बरोबर फिरायला जायचं असे, तें काय घर नव्हतें म्हणून? करायचं तेव्हां पुष्कळ प्रेम त्यांनीं माझ्यावर केलं. पण मध्येंच त्याला एक मांजर आडवं गेलं.

नवरा वाईट नादाला लागल्यावर बायकोला टाकतो, हें एकपरी बरंच आहे. कारण तिला कांहीं आपण होऊन त्याला टाकतां येत नाहीं. तेव्हां एका दृष्टीनें तिनंच त्याला टाकला असं म्हणायला हरकत नाहीं.

मला एकदां भयंकर दुखणं आलं होतं. त्यांतून मी वाचेन असं कोणालाच वाटलं नव्हतं. तेव्हांची गोष्ट. एके रात्रीं माझ्या अगदीं जवळ बसून, विचार करणं चाललं होतं. माझ्याकडे स्तिमित नेत्रांनीं बघायचं. मी म्हटलं ‘ काय ? ’ ते म्हणाले, ‘ आतां बरं वाटतं ना ? ’

मी हूं म्हटलं. दुखण्यानं मी जरी हैराण झालें असलें तरी मी चांगली शुद्धीवर होतें. बराच वेळ आम्ही नुसते एकमेकांकडे पहात होतों. नंतर मधूनच पाहूं लागलों. शेवटीं अशीच एकदां आमची दृष्टि भिडली व त्यांच्या डोळ्यांतून घळकन् पाणी आलें. ते तेथून उठूं लागले पण मी त्यांचा सदरा आपल्या क्षीण हातांनीं धरला. त्या माझ्या क्षीण हातांतच किती तरी जोर होता. मीं म्हटलं ‘ असं काय ! मला आतां बरं वाटताहे. मघाशीं औषधाचा डोस दिलात त्यानं मला हुषारी वाटली आहे. मला वाटतं मी बरी होणार. ’ पण हें शेवटचं वाक्य उच्चारतांना माझा आवाज कांपूं लागला. कारण मला ठाऊक होतें कीं मी बरी होणार नाहीं. काय वाटेल ते उपाय केले तरी या दुखण्यांतून कांहीं मी उठत नाहीं असं माझ्या मनानं घेतलं होतं. माझ्या क्षीण हातांत जसा त्यांना थांबवण्याइतका जोर होता तसाच माझ्या वरच्या बोलण्यांत—वरच्या खोट्या बोलण्यांत—एक प्रकारचा जोर होता. त्या माझ्या खोटया धीरानं त्यांना जरा खराच धीर आल्यासारखा दिसला. मी त्यांचे निजल्या निजल्याच डोळे पुसले. डोळे

पुसले म्हणजे काय, पुसल्यासारखे केले, कारण माझ्या अंगांत इतकी ताकद होती कुठं ? माझे हात बाजूला करून त्यांनीं म्हटलें, ' हो— तूं आतां लवकरच बरी होशील बरं. '

त्यांनीं मला तसं म्हटलं पण माझं मन मला उलट सांगत होतं. त्यामुळें त्यांचं म्हणणं मला न पटून माझी मरण्याची खात्री अधिकच वाढूं लागली. व मघां त्यांना खोटा धीर दिल्याबद्दल माझें मलाच वाईट वाटूं लागलें. मी गेल्यावर यांचें कसें होईल असा दुःखद विचार मनांत येऊन मला रडूं येऊं लागलें. मी स्फुंदत म्हटलें, ' नाहीं हो नाहीं. हा तुम्हांला भ्रम आहे. मला आतां बोलावणं आलं आहे. मला आतां गेलंच पाहिजे. पण—पण माझ्यामागं—इकडचं कसं होईल.' व मी अधिकच रडूं लागलें.

' घाबरूं नको. असे भलतेच विचार आणूं नयेत !' ते म्हणाले. व माझं डोकं मांडीवर घेऊन ते माझी समजूत करूं लागले. असंच आहे. जेव्हां माझी निराशा होई तेव्हां ते धीर देत—खोटाच धीर देत. व त्यांना वाईट वाटूं लागलें म्हणजे मी पण त्यांना खोटाच धीर देई. ते जों जों समजूत करूं लागले तों तों मला अधिकच रडें येऊं लागलें. मी रडतच म्हटलं, ' नाहीं हो नाहीं. ज्याला बोलावणं आलं त्याला जायलाच हवं. ज्यानं बोलावणं पाठवलं त्याची समजूत केली तर कांहीं फायदा. सावित्रीनं यमाची समजूत केली. तुम्हीं माझी खोटी समजूत करून काय उपयोग ? '

' असं म्हणूं नको. तुझ्याशिवाय मला क्षणभर तरी चैन पडेल का ? सावित्रीनं जशी यमाची समजूत केली तशी करायला मी तुझ्या मागोमाग आलोंच म्हणून समज.'

'नाहीं गडे !' मी त्यांच्या तोंडाकडे बोट करून म्हटलें. (कारण त्यांच्या तोंडापर्यंत हात उचलायला मला शक्ति नव्हती.) 'असं म्हणूं नये.' मी मघां कांहींच तरी बोलल्यें. त्याचा मला पश्चात्ताप झाला. 'सावित्रीनं कांहीं सत्यवानाच्यामागं देहत्याग केला नाहीं—खरंच गडे माझ्यामागं तुम्हीं लग्न करा.—'

'चप् ! असं बोलूं नये.' ते म्हणाले. 'आतां किनई तूं बरी होशील.'

'पण नाहीं झालें तर ? तुम्ही कराल ना ? कराल ना लग्न ? कराल ना तुम्ही—'

'असं काय भलतंच बोलावं ? सायकलीची सांखळी झिजली, तर नवी सांखळी टाकून पहिल्याप्रमाणें गाडा चालू करतां येतो खरा. नथ मोडली तर दुसऱ्या तारेनें बांधतां येते खरी. पण ही झाली निर्जीव—यांत्रिक जिन्नसेची गोष्ट. पण गुलाबाची कळी ठेवून खालची फांदी जर तोडून टाकली व तिच्याजागीं दुसरी आणून चिकटवली तर ती कळी उमलून तिचं फूल बनेल का ?'

त्यांच्या बोलण्याचा मला त्यावेळीं विशेष अर्थ समजला नाहीं. पण नंतर जेव्हां अर्थ कळला तेव्हां ते जे बोलले त्यांत कांहींच अर्थ नाहीं असें मागाहून सिद्ध झालें !

त्यांचे ते एकपत्नीव्रताचे विचार त्यावेळीं कितपत खरे होते हें मला सांगतां येत नाहीं. माझ्या संसारसुखाच्या आड येणारी, माझ्या जन्माचें वाटोळें करणारी, माझ्या आत्म्याला तळतळ करायला लावणारी एक छाया त्यानंतर थोड्याच दिवसांनीं त्यांच्या मागोमाग हिंडतांना मला दिसूं लागली. त्यांचे ते प्रेमोद्गार कदाचित्

अशा तऱ्हेच्या पुष्कळ गोष्टी घडत गेल्या, त्या सांगत बसत नाहीं. तिनं त्यांना कसा मोह पाडला किंवा ते तिच्या नादीं कसे लागले हेंही पण सांगण्यापासून फायदा नाहीं. मी ' वेडी ' (? !) कशी झालें तें सांगितलें म्हणजे बस्.

काळा डगला पाहिला म्हणजे जशी चोराला पोलीसाची भीति वाटते व साधा पोषाक पाहिला कीं डिटेक्टिव्हची शंका येते, तसें मला झालें. ते रागावून बोलले कीं मला वाटे आतां कोण आपल्याला विचारणार ? आतां बोलणीं खातच जन्म काढावा लागणार. मी मुळीं आतां आवडेनाशीच झालें आहें. हें वरवर बोलणं पण आंतून मन त्या लांबच्या नातलगीणीकडे !

मीही धीट झालें होतें, व हळूहळू त्यांच्या डोळ्यांत अंजन घालूं लागलें होतें.

एके दिवशीं अचानक एक पाहुणी आमच्या घरीं आली. त्यांनींही ती अचानक आली असं पाहून आश्चर्य दाखविलं. पण कोण जाणें ! अशा कांहीं गोष्टी झाल्या कीं ती येण्याची त्यांना आगाऊ खबर होती असा मला संशय आला. ती पाहुणी म्हणजे तीच ती—लांबची नातलग; बाहेर पुरुषांत बसून हंसणारी—खिदळणारी. माझ्या तोंडचा चहा काढून घेणारी. तेव्हां नुसता तोंडचा चहाच काढून घेतला, व पुढें मला घरांतून काढून लाविली.

ती बाई कांहीं वाईट नव्हती. ती त्यांची पहिलीच बायको असती तर त्यांचा जोडा उत्तम शोभला असता.

" आज जेवायला काय करायचं ? " मीं अमळ फणकाऱ्यानेंच विचारलें.

" कां ? " ते म्हणाले.

मी उत्तरलें. " आज पाहुण्याबाई आल्या आहेत ना ? "

" तशी कांहीं ती पाहुणी नाहीं. रोजचंच करा. "

मीं मनाशींच म्हटलें, " अस्सं ? ती कांहीं पाहुणी नाहीं अं ? हो, ती घरचीच. मी जशी घरची तशीच ती पण घरची. " त्या दिवशीं मीं चहा नेऊन दिला. एक कप कमी आला त्या दिवशीं मी त्या बाईला पाहून चरकलें तें उगीच नव्हे. आतां मीच कदाचित् पाहुणी होईन !

रागा-रागानें मीं स्वयंपाक केला. डोकें दुखण्याच्या सबबीवर मी जेवलें नाहीं. व तिसऱ्या प्रहरीं निजून राहिलें. चहा करण्याची वेळ झाली पण मी उठलेंच नाहीं. ते आले व म्हणाले " काय आज चहापाणी कांहीं आहे कीं नाहीं ? " मीं म्हटलें "माझं डोकं दुखत आहे."

" पण पाहुण्याबाईंना नको का चहा द्यायला ? " ते म्हणाले.

" पाहुण्याबाई ? " मी आश्चर्य दाखवून म्हणालें, " त्या तशा पाहुण्या नाहींत ना ? त्या तुमच्या घरच्याच. त्यांनाच सांगा. "

पाहुण्याबाईंना चहा करायला लावण्याचा माझा हेतु नव्हता. फक्त माझ्या मनांतील राग एकदां ओकून टाकायचा होता. मग मी तावा-तावानें उठलें व चहाला लागलें. स्पिरिट सांडलें. स्टो भडकवला. भांड्याची आदळ—आपट केली. कप फोडला. आणि दोन कप चहा तयार करून त्यांच्यापुढें नेऊन आदळला.

त्या पाहुण्याबाई कसल्या ? माझी सवतच ती ! मला सवत येणार आहे असं आमच्या लग्नाच्या आधीं कळतं तर माझ्या आईबापांनीं मला इथं दिली असती का ? माझ्या आईबापांचा आणि माझा त्यांनीं विश्वास-

घात केला. कदाचित् सवत येणार हें ठाऊक असतां मला इथं दिली असती, पण ती सवत मला घरांतून हांकून लावणार हें समजलं असतं तर ?

मी कित्येक दिवस मोहनमाळेकरतां रुप्याच्या डबीचा हट्ट धरून बसलें होतें. एक दिवस अचानक त्यांच्या टेबलाच्या खणांत मला एक नवी सुंदर नक्षी केलेली चांदीची डबी दिसली. मला वाटलें हीच ती व आनंद झाला. पतीबद्दल मला पुन्हा प्रेमाचा पान्हा फुटला. बायकांचं असंच आहे. मी राग विसरलें. बायकांना राग यायला वेळ लागत नाहीं व लोभ यायला वेळ लागत नाहीं. उष्णतामापक-यंत्रा प्रमाणंच. स्वत्व त्यांना नाहींच. त्या पाऱ्याप्रमाणं उष्णतेवर अवलंबून. सदा पराधीन. पतीबद्दल मन किती साशंक असलं आणि त्यानं येवढीशी गोष्ट केली तरी लागलीच बायकांची कळी उमलूं लागते. मीं हर्षानं गळ्यांतील मोहनमाळ काढली व डबींत घालून पाहूं लागलें. इतक्यांत तिकडून लगबगीनं यायचं झालं व म्हणायचं, " हांहां—ती आपली नाहीं—लोकाची. "

मी ओशाळून म्हणालें, " म्हंजे—कोणाची ? "

याचं उत्तर झट्दिशीं त्यांना देतां आलं नाहीं. तेव्हांच मीं ओळखलं डबी कोणाकरतां ती. मीं तिरप्या नजरेनं त्यांच्याकडे पाहिलं, त्यांनीं दृष्टी वळविली.

मला राग आला. आज इतके दिवस मी डबीकरतां हट्ट धरून बसलें होतें. पण मला आणली नाहीं. आणि—!

मीं जोरानं म्हटलं, " वा ! ही डबी माझी आहे. " मोहनमाळ आंत ठेवून मीं डबीचं झांकण लावलं.

" असं काय वेडयासारखं. लोकाची डबी—आपण कशी घ्यावी ? " ते डबी हिसकावून घेत म्हणाले.

" तर ? मी बरी देईन ? ही माझी मोहनमाळेची डबी आहे. तुम्हांला हवी तर दुसरी घ्या. "

" तुला दुसरी आणूं ? मग झालं ना ? "

" नाहीं. मला हीच पाहिजे. "

" तीच कशी मिळेल ? त्याच्यावर लोकाचं नांव कोरलं आहे ना ? "

" असूं दे. मला चालेल. "

" हें काय वेडयासारखं. "

" मी वेडी ? आणि लोकांच्या बायकांना भाऊबिजेच्या भेटी देणारे लोक शहाणे ? एक बायको असून दुसरीच्या नादीं लागणारे लोक शहाणे ? माझ्या जन्माचें वाटोळं करणारे लोक चांगले ? माझ्या आईबापांचा विश्वासघात करणारे दिवटे पुरुष शहाणे ? नाहीं, ही डबी मी देणार नाहीं. तुम्हांला हिसकावून घ्यायची असली तर घ्या आणि त्यांतली मोहनमाळ पण तिलाच नजर करा. नकोच पण, त्या मेल्या चांडाळणीला द्यायला ही डबी कांहीं मी तुम्हांला घेऊं द्यायची नाहीं. " असें म्हणत ती डबी मी पुन्हा त्यांच्या हातांतून सोडवली व खिडकीपाशीं जाऊन झट्दिशीं ती डबी खालीं फेकून दिली, व म्हटलें, " त्या सटवीच्या हातांत पडण्यापेक्षां या उकिरड्यांत पडली तरी चालेल. "

पण माझें भाषण ऐकण्याकरतां ते थांबले नाहींत. लगबग डबी शोधून आणण्याकरतां खालीं गेले.

अशा अनंत गोष्टी झाल्या.

* * *

कांहीं दिवसांनीं आम्ही एकमेकांना कंटाळलों व कारणानं माहेरचं बोलावणं आलं, तेव्हां त्यांनींही हरकत घेतली नाहीं व मलाही जाणं प्राप्त होतं. कारण बाबा आजारी होते. मी माहेरीं पोहोंचल्यानंतर दोनच दिवसांत बाबा वारले व लगेच आईही आजारी पडली. आणि माझं पुढचं दुःख पाह्यला नको म्हणूनच कीं काय तीही बाबांच्या पाठोपाठ चालती झाली ! यावेळीं आम्ही आमच्या खास मालकीच्या घरीं रहात होतों. आतां जवळचा असा भाऊ व थोरली बहीण येवढींच काय तीं माहेरचीं माणसं मला उरलीं ! नवरा होता पण तो कुंकवापुरता !

बाबांच्या मरणानंतर अर्थात् मला माहेरींच रहावें लागलें, व पुढें आई एकटी म्हणून माझें परतणें लांबणीवर पडलें. पुढें आईही गेली व दादाकरतां मी तशीच माहेरीं राहिलें, पण आईही गेल्यानंतर मला तेथें बरें वाटेना व आपल्या घरीं परतावेंसें वाटूं लागलें.

पण तिकडून घरचें बोलावणें येईना कीं पत्राचें उत्तर येईना ! मध्यंतरीं एकदां पत्र आलें पण त्यांत कांहीं सबबी सांगून उडवा-उडवीच केली होती. तें आधीं लक्षांत येईना, पण पुढें समजलें कीं त्यांच्या मनांत मला परत न्यावयाची नाहीं.

दोन वेळां मी तशीच त्यांच्या घरीं गेलें. पण पहिल्या खेपीं त्यांना कोठून तरी गुणगुण लागली व ते गांवालाच निघून गेले. दुसऱ्या खेपीं मी घरीं गेलें. पण तेव्हां तें मला लोकांचें घर वाटूं लागलें. कारण आतां त्यांनीं त्या बाईबरोबर संसार थाटला होता व माझी सवत राजरोस यजमानीणबाई म्हणून वावरत होती ! तरी मला तिनं चांगलं वागवलं. ज्या घरीं मी हुकूम फर्मावयाची त्या घरीं मला चोरा-

सारखं झालं. ते माझ्याशीं बोलले नाहींत. जशी एकादी घरची छत्री तशीच मी, अर्थात् त्या घरीं राहणं मला शक्य नव्हतं व कारणानें मी माहेरीं परतलें.

माझ्या भावाच्यानें माझी ही असहाय स्थिति पहावेना. त्यांनीं निरनिराळ्या तऱ्हेनें त्यांची समजूत पाडण्याचा प्रयत्न करून पाहिला पण व्यर्थ. अखेर भाऊ हट्टाला पेटला व मीही नागिणीप्रमाणें चवताळलें. त्यांनीं मला फसवून जसें माझें जन्माचें वाटोळें केलें तसें त्यांना फसवून या जगातूनच नाहींसें करण्याचा आम्हीं कट केला !

एक दिवस दादानें त्यांच्या नांवानें असें पत्र लिहिलें कीं, मी अतिशय आजारी आहें तरी एकवारच भेटून जावें. पण त्याचें उत्तर आलें कीं तेही आजारी आहेत. व हवापालटण्याकरतां जाण्याचा विचार असल्यामुळें त्यांना येतां येत नाहीं. पुन्हा आम्हीं उलट तार केली कीं, मी आतां फार दिवसाची सोबतीण नाहीं. तर शेवटचें एकवार दर्शन देऊन जावें. माझा जीव अडकून पडला आहे.

काय असेल तें असो, ही तार लागूं पडली व ते आले. ते लांबून येताहेतसे दिसतांच राजाभाऊनें मला खूण केली व झटदिशीं मी पलंगावर जाऊन एकाद्या मरणोन्मुख आजाऱ्याप्रमाणें निजलें. निजल्या निजल्या मला बैलांचीं घुंगरं ऐकूं येऊं लागलीं. क्षणभर माझी मलाच भीति वाटली. मीं मनांत म्हटलें, “ देवा, या प्रसंगीं मला धीर दे.” फाटक उघडलेलें मीं ऐकलं व पावलें ऐकलीं. कोणी तरी हळू हळू बोलत येत होतें. मीं तो आवाज ओळखला. माझी छाती धडधडूं लागली, व अंगाला घाम सुटला. मीं पुन्हां देवाजवळ करुणा भाकली.

क्षणिक पण मनापासूनचे असतील. कदाचित् वरकरणी असूं शकतील. कारण प्रेम जसं आंधळं असतं तसं मुकंही आहे. प्रेम बोलून दाखवितां येत नाहीं. त्याचा उच्चार करावा लागत नाहीं. प्रेमाला मुळीं वाचाच नसते. ज्याच्या मनांत खरं प्रेम आहे त्याच्याच्यानं बोलवत नाहीं. उथळ पाण्याला खळखळ फार. सर्व अंतःकरण, नसन् नस प्रेमानं इतकी भरलेली असते कीं काव्यमय विचारांना त्यांत थाराच नसतो.

प्रथम मला तें खरेंच वाटेना. ते भलतीच्या नादीं लागले आहेत असें मला कोणीं आडून सुचविण्याचा यत्न केला, तर मी त्या माणसालाच मोडून काढी, व त्यानें फारच केलें, तर त्याच्याबद्दल मला संशय येई. जगांत असाच उलटा न्याय आहे.

* * *

मध्यंतरीं घडलेल्या गोष्टी मी सांगत बसत नाहीं.

एक दिवस म्हणायचं कीं माझ्याकडे दोन मित्र येणार आहेत चहाला. मी फराळाची सर्व तयारी केली व वाट पहात रात्रीची भाजी चिरीत आंत बसलें.

इतक्यांत मला चहा करण्यास सांगितलें. मी तीन पेले चहा करून घेऊन त्यांच्या खोलीच्या दाराशीं आलें. पहातें तों आंत एक तरुण विधवा स्त्री खुर्चीवर बसून मित्रांशीं हसतांना मला दिसली. तो अनपेक्षित प्रकार पाहून मी थोडी दचकलेंच. इतर वेळीं मीं चहाचें ताट तडक आंत पुरुष मंडळींत नेऊन ठेवलें असतें पण ती बाई तेथें असल्यामुळें मला आंत जाण्याचा धीर झाला नाहीं ! काय असेल तें असो. मी बाई मनुष्य पण आजन्मांत पहिल्यानेंच बाईला

पाहून लाजलें. लाजलें म्हणा किंवा भ्यालें म्हणा. गिधाड अगर घुबड पाहिलं म्हणजे जसं मन अमळ विषाद पावतं तसं मला ती मोहक तरुणी पाहून वाटलं. तिनं खरं पहातां त्या वेळीं—निदान माझ्या दृष्टीनं—माझं काय घोडं मारलं होतं ? पण मला तो एक प्रकारचा अपशकुन वाटला. त्या वेळीं तो खराच अपशकुन वाटला कीं नंतर गोष्टी समजल्यावर माझी तशी कल्पना झाली कोणास ठाऊक. कदाचित् असं असेल कीं पुरुष पत्करला पण पुरुषांत वावरणारी बायको नको असं माझ्या मनानं घेतलं असेल.

मी तीन पेले ठेवून परतणार तोंच त्या दोन मित्रांपैकीं एकजण म्हणाला, 'आणखी एक कप पाहिजे बोवा.' मग मीं माझ्याकरतां ठेवलेला एक कप आणून दिला. या खेपीं खोलीच्या दरवाज्यापर्यंतही मी गेलें नाहीं. मला त्या बाईची भीतिच बसली.

मंडळी गेल्यावर मीं विचारलें 'तीं बाई कोण ?' ते म्हणाले, 'आली होती त्या मित्रांच्याबरोबर. आमचंही लांबचं नातं निघताहे आजोळाकडून.'

'मग आंत नाहीं आली ती माझ्याकडे ?' मीं म्हटलें, 'निदान जातांना येवढं कुंकू तरी लावलं असतं !' असेंही माझ्या मनांत म्हणावयाचें होतें. कारण त्या बाईची वर्तणूक व यांची पालटलेली चर्या पाहून मी बिथरलें होतें. लोकांमधील गुणगुणीची व या विधवेची सांगड मला त्या वेळीं घालतां आली नाहीं, म्हणजे आठवलीच नाहीं. मीं अगदीं तिऱ्हाइतपणें जो त्यांचा संबंध जोडला तेवढाच.

पण जेव्हां मी स्वयंपाकाला लागलें तेव्हां ते लागेबांधे हळूहळू जुळूं लागले. व स्वयंपाकांत माझें मन लागेना.

इतक्यांत खोलीचा दरवाजा वाजला. मी डोक्यावरून पांघरूण घेऊन स्तब्ध निजले.

माझ्या मनांत परस्पर विरोधी विचारांचें विलक्षण काहूर माजलें. प्रत्यक्ष आपल्या पतीला ठार मारण्याचा मीं घाट घातला होता. तोही त्याला फसवून. किती भयंकर कल्पना ! ही कल्पनाच इतकी भयंकर वाटते तर प्रत्यक्ष तशी कृति माझ्या हातून कशी घडून येईल ? मी कोण ? मी त्यांची विवाहित पत्नी ना ? कार्येषु मंत्री करणेषु दासी इत्यादि कर्तव्यें बजाविणारी मी त्यांची सहधर्मचारिणी ना ? संकटकाळीं जिनं मदतीला धांवायचं तिनंच त्यांना संकटांत घालायचं ? आणि तेंही असं फुसलावून ? छे ! छे ! ज्याला एकदां आपलं म्हटलं त्याचा असा केसानं गळा कापायचा ? खून म्हणजे आधी हिडिस स्वरूपाचा-आणि आपल्याच पतीचा खून म्हणजे त्याचं स्वरूप किती तरी पट भेसूर, राक्षसी ही ! कल्पना आपल्या मनांत तरी कशी आली ? दिवाळसणाला त्यांनीं साज आणला—माझ्या खऱ्या दुखण्यांत ज्यांनीं उशाशीं जागून जाग्रणें केलीं, चांदण्यांत ज्यांच्याशीं सुखसहल केली—त्यांच्याशींच असें बेइमान व्हायचें ? माझ्या आईबापांनीं ज्यांच्या चरणावर मला वाहिली त्याच्याच उरावर बसायचं ?

अशा पश्चात्तापकारक व भेसूर विचारांत मी गर्क असतां माझें भान नाहींसें झालें होतें. मी भानावर आलें तेव्हां माझ्या तोंडावर पांघरूण नव्हतें व त्यांचा हात माझ्या हाताला लागलेला होता.

अहाहा ! मला पुन्हा एकवार त्यांच्या सहवासांतील अनेक सुख-दुःखाच्या प्रसंगांची आठवण झाली. त्या हातानें कितीदां तरी माझ्या

डोळ्यावरचे अश्रु दूर केले होते. आजारीपणांत त्या हाताच्या उशी-बर मी कितीदां तरी निजलें होतें. माझ्या जिवावरच्या दुखण्यांत त्या हातानें किती श्रम घेतले होते.

" बरं आहे ना ? " ते म्हणाले.

मी अद्याप नीट भानावर आलें नव्हतें. मी अंतराळीं पहात होतें. त्यांनीं नाडी पाहिली. माझी नाडी त्यावेळीं थाडथाड उडत असली पाहिजे. माझ्या गालाला त्यांनीं हात लावला तेव्हां माझें अंग त्यांना तापलेलें लागलें असलें पाहिजे. माझ्या गळ्याला हात लागला तो घामानें ओलाचिंब झाला असावा. आजारीपणाचीं पुष्कळच लक्षणें माझ्यांत खरोखरच आलीं होतीं. एका अर्थीं मी खरीच आजारी होतें. शरीरानें नव्हे पण मनानें.

" आतां घाम येऊं लागलासा दिसतो, आतां ताप उतरेल. " ते मला न्याहाळीत म्हणाले.

पण यावेळींही माझें तिकडे इतकें लक्ष नव्हतें. अद्याप माझा विचार चालला होता. तराजूंत नवें वजन टाकलें म्हणजे तराजू स्थिर होईपर्यंत जशीं पारडीं वरखालीं होत असतात तसें माझें चाललें होतें.

मागच्या खऱ्या आजारीपणांत त्यांनीं असाच माझ्या कपाळाला, गळ्याला हात लावला होता. त्या वेळीं ते जसा खोटा धीर देत होते तसाच आतांही देत होते. दुखण्याच्या बाबतींत त्यांचा धीर खरा ठरला. पण त्या वेळीं मीं 'दुसरें लग्न करा' म्हणून सांगितलें तेव्हां त्यांनीं जीं अभिवचनें दिलीं तीं मात्र सर्व फोल ठरलीं ! हेंही पण मला एकाएकीं आठवलें. धड माझ्या मरण्याचीही त्यांनीं वाट

पाहिली नाहीं. मी मेल्यानंतर देखील जी गोष्ट करायला धजणार नव्हते तीच गोष्ट माझ्या डोळ्यांदेखत त्यांनीं केली.

" मला ओळखलं का ? मी कोण ? " त्यांनीं विचारलं.

इतक्यांत माझ्या डोक्यांत लख्ख प्रकाश पडला. ते कोण हें मी विसरत चाललें होतें. ते कृतघ्न पति नसून एके काळीं माझ्यावर प्रेम करणारे पति होते असें वाटूं लागलें होतें. पण ' मी कोण ' हा प्रश्न विचारून त्यांनीं मला त्या विषयावर विचार करण्यास प्रोत्साहन दिलें. ' मी कोण ! मला ओळखलं का ? ' होय. मीं ओळखलं. तुम्हीच ते. बायकोशीं विश्वासघात करणारे. सूडाचा निश्चय डळमळूं लागला होता. पण आतां ' ते कोण ' याची खरी जाणीव मला पटल्यावर तो निश्चय स्थिरावूं लागला. हा झगडा पति आणि पत्नीमधला नसून चांगल्या-वाईटाचा होता. सत्य आणि असत्याचा होता. अर्जुनाला असाच संमोह उत्पन्न झाला होता. तेव्हां भगवान् श्रीकृष्णानेंच सांगितलें होतें कीं हा संग्राम सत्य आणि असत्याचा आहे. यांत हा बाप, हा गुरु, हा भाऊ, हा मुलगा असा विचार करूं नको. मलाही कोणी तरी सांगितलें कीं या माझ्या युद्धांत ही बायको, हा नवरा असा भेद करूं नको. शिवाय भीमानें विश्वासघातानेंच दुर्योधनाची मांडी फोडली. माझ्या कार्याला अशाप्रकारें जणों देवाचीच शिकवणी—संमति मिळाली व मला एक प्रकारचें अवसान भरलें.

मी ताडकन् उठलें व त्यांचा हात गच्च आंवळला. " होय तर ! मी तुम्हांला पूर्ण ओळखतें—"

मला वाताचा झटका आला असें त्यांना वाटलें असावें. मला त्यांनीं बळेंच पलंगावर निजविण्याचा प्रयत्न केला, पण मी त्यांचे

दोन्ही हात घट्ट धरून त्यानांच पलंगावर बसवून मी त्यांच्याजवळ खालीं उभी राहिलें. त्यांनीं भाऊला हांक मारली. मी त्यांना तशीच घट्ट धरून म्हणालें, “ छे छे. मला वात झाला नाहीं, कांहीं नाहीं. मी पूर्ण शुद्धीवर आहें. भाऊला हांक मारण्यांत अर्थ नाहीं. त्याला सर्व ठाऊक आहे. पापी माणसाच्या हांकेला तो ओ देणार नाहीं... होय, मी तुम्हांला चांगलं ओळखतें. ऐका. तुम्ही कोण ? तर माझे एके काळचे पति. एके काळीं मला उराशी बाळगून प्राणापलीकडे जपणारे माझे पति. मला दिवाळसणाची भेट म्हणून प्रेमानं साज आणून देणारे. मी खरी आजारी असतां माझ्या उशाशीं बसून रात्रीच्या रात्रीं जाग्रण करणारे. माझ्या वांचून ज्यांना मुळींच चैन पडत नसे ते तुम्ही. मी मेल्यानंतर माझ्या मागोमाग यायला तयार असणारे. व मी लग्न करा म्हणून म्हणत असतां मला उलटीं अभिवचनें देणारे. चांदण्या रात्रीं सुखदुःखाच्या गोष्टी बोलणारे. ते तुम्ही माझे एके काळचे पति. पण आतां तुम्हीं कोण ? तर ज्यांचे हात दुसरीच्या गळीं पडल्यामुळें विटाळले आहेत. ज्यांची जीभ खोटी आश्वासनें देते. ज्यांचे डोळे भलतीच्या नादांत आंधळे झाले आहेत. ज्यांचं मन पापी विचारांनीं विटाळलं आहे. असे तुम्ही आतां प्रत्यक्ष पापाचे पुतळे माझ्यापुढं बसलां आहां. विश्वासघातकी, बेइमान, केसानं गळा कापणारे, खाटीक ! माझ्यासारख्या गरीब बायकोचं जन्माचं वाटोळं करणारे राक्षस ! तुम्हांला कसं मी ओळखणार नाहीं ?

आतां मी कोण तें सांगतें. कारण तुम्हींच मला ओळखलं नाहीं. तुम्हीं मला ओळखलं असतं तर ‘ मरायला ’ इथं कशाला आलां असतां ? मी तुमची धर्माची पत्नी आहें. तुमचं मन आणि शरीर

दोन्हीं विटाळलीं आहेत. पण मी कायावाचामनानं पवित्र आहें. आणि तुम्हांला पण आज मी पावन करून घेणार आहें. तुमच्या दुष्कृत्याबद्दल तुम्हांला शासन करून मी स्वर्गाचं द्वार तुम्हांला मोकळें करून देणार आहें.

लग्नांत माझ्या कपाळाला जें तुम्हीं कुंकूं लावलं तें कुंकूं नसून आमच्या व स्वतःच्या घराण्याला कलंक लावलांत. गळ्यांत मंगलसूत्र बांधलं तें मंगलसूत्र नसून माझ्या गळ्याला फांसच लावलांत. माझ्या-बरोबर जी सात पावलं चाललांत ती मला संसाराच्या कड्यावरून ढकलून देण्याकरतां. त्या दोन्ही कुळांना कलंक लावणाऱ्या, माझ्या गळ्याला फांस लावणाऱ्या, माझ्या संसाराची माती करणाऱ्या तुम्हांला मी कसं ओळखणार नाहीं ?

मी कोण तें आतां ध्यानांत आलं ? आपण आतां एकमेकांना पुरं ओळखलं ना ? मग ऐका तर तुम्हांला मीं येथें कशाला आणलं. तुमच्या पापांचा आतां घडा भरला आहे तो ओतून टाकायला. तुमचे विटाळलेले हात, विटाळलेली जीभ, विटाळलेला आत्मा यांना पावन करून घेण्याकरतां. यांची शुद्धि फक्त पश्चात्तापानं व्हायची नाहीं. शिवाय, पश्चात्तापानं व्हायची असती तर मागेंच—एव्हांना व्हायला पाहिजे होती. मीं तुम्हांला पश्चात्ताप व्हायला देखील पुरेसा वेळ दिला आहे. पश्चात्तापानें फार तर मन शुद्ध होईल. पण विटाळलेलं शरीर मरणाच्या आगीखेरीज कसं पावन करून घेणार ?....

आतां तुम्ही हालचाल करण्याच्या—माझ्या हातांतून सुटण्याच्या मुळींच भानगडींत पडूं नका. तुमचं येथें कोणी नाहीं. तुम्हीं हांका मारल्या, ओरडलां तरी काळं कुत्रं तुमच्या मदतीला धांवून येणें शक्य

नाहीं. माझ्या मदतीला आतां खुद्द भगवान् श्रीकृष्ण आहेत. आपण लहानशा खेड्यांत एका बाजूच्या बंगल्यांत आहोंत. दाराशीं आमचा गडी आहे. माझ्या पाठीशीं माझा पाठीराखा भाऊ आहे. तेव्हां आलेलं मरण निमुटपणें सोसा. गांवांतील सगळे लोक आमच्या बाजूचे आहेत. मी जर पैशाच्या लालचीनं अगर अन्य मोहामुळें तुमच्या जिवावर उठलें असतें तर दुसरं कोणी नाहीं तरी देव तुमच्या हांकेला धांवला असता, पण आतां असत्याला शासन होत असल्यामुळं त्यालाही पाझर फुटायचा नाहीं.

येथें आतां जो प्रकार होईल तो कोणाला समजणार सुद्धां नाहीं. कारण असं पहा कीं तुमच्या पत्रावरून उघड होत आहे कीं तुम्ही आजारी आहां व हवापालट करण्याकरतां गांवाला जाणार आहां. मग झालें तर. ह्याच ठिकाणीं तुम्ही हवा पालटण्याकरतां आलां, पण प्रकृति अधिकच विकोपास जाऊन त्यांतच तुमचा अंत होणार !

मी आजारी नाहीं हें तुम्हीं ओळखलंच असेल. माझी नाडी जरी जलद चालत असली, गाल कढत असले, किंवा गळयाला घाम आला असला आणि मी वात भरल्यासारखी बडबडत असलें तरी तशी मी आजारी नाहीं.

मी आजारी असल्यामुळें आपलं दर्शन घेण्याची इच्छा दर्शविली तरी तुम्ही खोटी सबब सांगून आला नाहीं. तीच सबब मी आतां खरी करून दाखविणार आहें. शेवटचें दर्शन देण्याइतकी सुद्धां तुम्हांला माझी कींव आली नाहीं.

आतां जे तुम्ही आला तें कांहीं मला शेवटचें दर्शन देण्याकरतां नव्हे. तर तुमच्या डोळयांदेखत मी मेलेली पहाण्याकरतां ! तुम्हांला वाटलं असेल

कीं ही आतां मरणारच. पण नाहीं. देवानें मला बळकट आयुष्य दिलं आहे. मला त्याचा कांहीं उपयोग नाहीं. आणि तुमच्या पाठीमागें माझी पण जगण्याची इच्छा नाहीं. पण तुमचा निकाल लागेपर्यंत माझ्या डोळ्यांनीं तुम्हांला शासन झालेलें पाहिल्याखेरीज मरण्याची माझी इच्छा नाहीं आणि म्हणूनच मी इतके दिवस तरी जगलें आहें. माझी अखेर पाहण्याकरतां तुम्ही आला पण मीच तुम्हांला आतां मूठमाती देणार.

तुम्हांला फुस लावून येथें आणून या जगांतून नाहींसें करण्याचें कृत्य तुम्हांला नीचपणाचें वाटेल. मी मित्री आहें असें म्हणाल. पण तसें नाहीं. तुमचा जीव मला भर रस्त्यांत सांगून—सवरून घेतां आला असता. कारण मला जीवाची पर्वाच नाहीं. तुमच्या घरीं येऊन मी हट्टानं राहिलें असतें तर हातांनीं बाहेर काढून लावण्याची तुमची छाती नव्हती. किंवा अन्य रीतीनं तुम्हांला मला छळतां आलं असतं. वकील कोर्ट करितां आलीं असतीं पण तुमच्या सारखी लाज मीं अद्याप टाकली नाहीं. आपल्या कुलाचा अभिमान माझ्यांत जागृत आहे. पण मुद्दाम तुम्हांला फसवून तुमचा नायनाट करण्याचा माझा हेतु होता. तो हाच कीं एकाद्या माणसाला फसवलं म्हणजे त्याची कशी असहाय केविलवाणी स्थिति होते तें तुम्हांला नीट कळावं म्हणून. तुम्हीं मला फसवलं, मला वेडी ठरविलीत. माझ्या मनाच्या यातनांची तुम्हांला थोडी तरी कल्पना यावी म्हणून मुद्दाम फसवून तुमचा केसानं गळा कापण्याचा पण मीं केला.......भाऊऽ"

इतक्यांत भाऊ आंत आला. तो आल्यावर त्यांना अमळ धीर आल्यासारखें दिसलें. लगेच मीं म्हटलें, "भाऊ, आण ती इकडे."

त्यानें माझ्या हातांत एक लहानशी जिन्नस दिली. नंतर त्यांच्याकडे वळून मी म्हणालें, " ही पहा, ही पहा पिचकारी. ही तुमच्या हातांत टोंचली जाईल. हिच्यांत जें द्रव्य भरलें आहे तें निमिषार्धांत तुमच्या नसानसांत शिरेल. ह्या द्रव्याच्या अंगीं मोठा शोषक गुण आहे. हें द्रव्य तुमच्या शरीरांतील सर्व पाप धुवून काढील. रक्ताचा थेंब न् थेंब पुनीत करील. असें करतांना तुम्हांला त्रास किंवा दुःख मुळींच होणार नाहीं. तुम्हीं स्वस्थ झोंपी जाल, ते पुन्हा कधींही उठावयाचे नाहींत !...तर आतां या शुद्धीच्या संस्काराला तयार व्हा....मीही तुमच्या मागोमाग हें विष टोंचून घेणार....भाऊ."

माझ्या धिटाईनें व चमत्कारिक बोलण्यानें प्रथम ते स्तंभितच झाले होते. प्रथम कदाचित् त्यांना हें सर्व खोटें वाटलें असेल. मी कांहीं तरी बडबडत आहें असें वाटलें असेल. पण आतां परिस्थिति त्यांना चक्क जाणवली. व कांहींतरी अघोर प्रसंग येऊन खराच ठेपला आहे, अशी त्यांची खात्री झाली. सुटून जाण्याकरतां त्यांनीं पुष्कळ धडपड केली, पण भाऊच्या दांडग्या शक्तीपुढें त्यांची मात्रा चालेना. त्यांनीं ' खून ! धांवा ! ' म्हणून आरोळ्या मारल्या पण व्यर्थ. त्यांनीं भाऊची विनवणी केली, पण यावेळीं मन दुर्बल करणें बरें नव्हतें. भाऊनें त्यांना दडपून पलंगावर निजवलें, व त्याच स्थितींत त्यांना घट्ट दाबून ठेवलें.

एव्हांना बरीच तिनीसांजा टळून अंधार पडला होता. या खोलींत मुद्दाम दिवा लावला नव्हता.

मीं मनांत म्हटलें, ' देवा, हें साहस करण्यास मला धीर दे. ' नंतर उघड, " तुमची कांहीं अखेरची इच्छा असली तर सांगून ठेवा.

तुम्हांला कोणाची आठवण करायची असेल तर करा. तुमच्या या पापी देहाचा भार पृथ्वीला असह्य होत आहे, ' तिची ' आठवण करायची असेल तर करा–हां–सुटून जाण्याचा यत्न करूं नका—त्यामुळें तुम्हांला विनाकारण त्रास होईल. हे सुटून जाण्याचे मार्ग तुम्हांला पापं करतांना कां आठवले नाहींत ? आतां अनायासें शुद्धिकर्म घडत असतां पळून जाण्याची अवदसा कशी सुचते ? बस्स. भरली तुमची घडी. देवा, माझ्या हाताला स्थैर्य दे. घ्या देवाचं नांव–भाऊ–दिवा—"

आपल्या खिशांतून भाऊनं विजेच्या गुंडीचा दिवा काढला. त्यांचा हात त्यानें घट्ट धरून ठेवला. मीं पिचकारी त्यांच्या हाताजवळ धरली.

या वेळीं माझी सवत काय करीत असेल ? मी मरणार किंवा मेलें असेन, व आपल्या वाटेंतला एक कांटा कायमचा जाणार अशा आनंदांत मिटक्या मारीत असेल. ते माझी वाट लावून परत आले म्हणजे आपण निर्विघ्नपणें संसार करूं अशा कल्पनातरंगांत झुलत असेल.

त्यांनीं पुन्हा एकदां आरडा-ओरडा केला, धडपड केली पण व्यर्थ.

मीं त्यांच्याकडे पाहून म्हटलें, " मागं तुमचं पाणिग्रहण केलं तें तुमची सहधर्मचारिणी म्हणून. तुमच्या बोटाला सुई बोचली तर माझं रक्त गळे. पण आतां तुमचं सगळं रक्त गोठवतांना जितकं दुःख तितकंच समाधान वाटत आहे. शिवाय लग्नांत तुम्हींच मला ' धर्मेच ' वगैरे वचनें दिलींत. मीं एकाही वचनानें बांधलें गेलें नव्हतें. रुप्याच्या डब्या ही गटारांत फेंकतें वगैरे गोष्टी उठवून मला खोटीच वेडी ठरवून टाकली....पुन्हा देवाचं नांव घ्या आणि पापक्षालन करून घेण्यास मन घट्ट करा. "

आतां रात्रीं साडे साताचा सुमार होता. आमच्या खोलींत अंधेर होता. कोटाची बाही वर सरकावली व भाऊनें विजेच्या दिव्याचें बटन दाबून बाहीवर एकदम प्रकाश सोडला. मीं देवाचं नांव घेतलं, मी सुई टोंचणार इतक्यांत मला कांहीं तरी भयंकर दृश्य दिसलें, मीं एक कर्कश किंकाळी फोडली, व झटकन् मागें झालें. भाऊचे हात ढिले होऊन, तो मला सावरण्याकरतां आला. क्षणार्धांत मीं धैर्य गोळा केलें—पण—

पिचकारी खालीं पडून फुटली होती, व तो पलंग रिकामा दिसला!

पुढील कहाणी सांगण्यांत कांहीं अर्थ नाहीं. माझा भाऊ काळ्या पाण्याच्या शिक्षेला गेला. मी वेड्याच्या इस्पितळांत आलें व ते आपल्या नव्या 'बायकोसह' थाटानें संसार चालवीत आहेत.

त्यांना माझी कधीं तरी आठवण होत असेल व तिलाही होत असेल. तिला कदाचित् वाटत असेल, अगर सध्यां इतकी खुळी असेल तर कांहीं दिवसांनीं शहाणी झाल्यावर तरी तिला अशी भीति पडेल कीं जो नवरा एका बायकोला टाकतो तो दुसरीलाही कशावरून टाकणार नाहीं? त्यालाही कदाचित् तिचा कंटाळा आला असेल व लांबून जरी त्यांच्या संसाराची तुळई भक्कम दिसली तरी आंतून तिला कीड लागली असेल व लागली नसेल तर लागेल. ज्यांच्या संसाराचा पायाच असा अधू त्यावर इमारत किती दिवस टिकेल? कोणत्याशा लोकांत पूर्वीं अशी शिक्षा देत असत म्हणे कीं गुन्हेगाराला एकाद्या मढ्याला बांधावयाचें व रात्रभर तें गाठोडें तसेंच बांधलेलें ठेवावयाचें. कदाचित् देवाच्या मनांत त्यांना अशीच शिक्षा द्यावयाची असेल. मरून जाण्यापेक्षां त्या जिवंत मढ्याला रात्रंदिवस उराशीं बाळगून धरण्याची ही शिक्षा असेल! हें झालं माझ्या वेडीचं म्हणणं.

हें झालं माझ्या वेडीचं म्हणणं.

पण मुख्य सांगायचं राहिलंच. मी पिचकारी टोंचतांना कां दचकलें? पिचकारी माझ्या हातांतून कशी पडली? मी मोठ्यानं किंकाळी कां फोडली? मला या विजेच्या प्रकाशांत काय दिसलें?— एक गोंदलेला गोरा हात! त्यांनीं केव्हां तरी त्या बाईचं चित्र आपल्या हातावर गोंदून घेतलें होतें, आणि पांच वर्षांपूर्वीं असाच एक गोंदलेला हात मला एकाएकीं दिसून मी भेदरलें होतें. त्या परिस्थितींत बरेंच साम्य होतें. त्यावेळीं अंधार पडला होता. मी एकटी होतें आणि माझ्या खांद्यावर कोणी जड हात ठेवला होता, व दुसऱ्या हातानें माझें मनगट धरलें होतें. मी वळून पाहिलें. त्याचवेळीं लांब वळणावरून येणाऱ्या त्यांच्या मोटारीचा उजेड नेमका त्या हातावरून सर्चलाइटसारखा गेला. तो हात एका गोऱ्या सोल्जराचा होता व त्या हातावर तसेंच एक बाईचें चित्र गोंदलेलें होतें. सैन्यांतून पळालेला एक सोल्जर दुसऱ्याच दिवशीं आमच्या गांवीं पकडण्यांत आला होता. त्या गोंदलेल्या हाताची मीं मनांत हाय घेतली होती. मीं त्या प्रसंगाचा उच्चार केला नव्हता, मनांतल्या मनांत ती भीति चेपून–दडपून टाकली होती.

अशा अकल्पित रीतीनें त्या भयंकर दृश्याचें प्रतिबिंब पाहून मी जात्याच–कारण नसतां दचकलें. त्या कोंडलेल्या भावना प्रदीप्त झाल्या. क्षणभरच कां होईना त्या पहिल्या प्रसंगाप्रमाणेंच मी एकाएकीं घाबरलें. तसाच गोरा गोंदलेला हात मला मोटरच्या उजेडांत क्षणभर दिसला होता. मेलेली आठवण अकल्पितपणें जिवंत झाली!

---

# अयोग्य निवड

" बरं, मं येऊं ? "

" अगबाई ! इतके घोड्यावरसे आलांत ? थांबा अमळ. बाळे, अग बाळे, यवढा चहा कर पाहूं यांना—"

" छे छेः ! काकू, चहा–बिहा नको आतां. उशीर होईल. आणखी जायचं आहे एक दोन ठिकाणीं. "

" सगळंच मुसळ केरांत ! तुम्ही चहा घेत नाहीं–अगदींच विसरलें घाईंत. बाळे, त्यवढा शिंक्यावरचा एक लाडू अन् दोन वड्या दे पाहूं बशींत.—बसा हो–कोर्टाची तारीख नाहीं ना अगदीं नेमली !—काढलंस का ?

" माझा नाहीं हात पोंचत ! " तिरसट मुद्रा करून व मानेला एक हिसडा देऊन बाळी म्हणाली.

" इश्श ! असं काय बरं करावं ? ती घडवंची घे खालीं.—हात गुंतलेहेत म्हणून. "

गोपाळरावांना इकडे उशीर होत होता. ते म्हणाले, " राहूंद्या काकू. मीच घेतों. "

गोपाळरावांच्या कॉलेजांतील ( एक पास व एक नापास अशा ) दोन परीक्षा झाल्या होत्या. ते सुसंस्कृत मनाचे पण अमळ जुन्या मताचे होते. खानदेश जिल्ह्यांत एका तालुक्याचे ठिकाणीं ते अव्वल कारकून होते पण लवकरच ते मामलतदारीच्या ' ग्रेड ' मध्यें जाणार

होते. त्यांची पहिली बायको वारली होती व स्वतः गोपाळराव जरी दुसऱ्या लग्नासंबंधीं मूक राहिले होते तरी इतर मंडळी " परोपकाराय सतां विभूतयः " या न्यायानें त्यांचें कोठें तरी जमविण्याच्या खटपटींत चूर झाली होती.

काकूंचे यजमान म्युनिसीपालिटीचे ' चीफ हपीसर ' होते. व या कुटुंबाला पांच खालोखालच्या मुली, दीड हजार कर्ज आणि संधिवात या तिन्हींची काळजी वहावी लागे. पहिली मुलगी उजवितां उजवितां त्यांचा एक गुढगा ताठला होता व कर्जांत सातशें रुपयांची भर पडली होती. अर्थात् दुसऱ्या मुलीकरितां जोडे झिजविण्याचें अवसान ( किंबहुना जोडेही ) त्यांच्या पायांत राहिले नसल्यामुळें, घरबसल्या होईल तितकें वरशोधनाचें काम काकूंनीं आपल्याकडे घेतलें होतें. पण त्यांच्या या लंगडया प्रयत्नाला बाळीच्या डोळ्यांतील तिरळेपणा चांगलासा पाठिंबा देत नव्हता.

गोपाळरावांनीं एकच वडी तोंडांत टाकली.

" बरी आहे का ?—बाळीनं केल्यान्. कशा अगदीं मोठ्या माणसासारख्या केल्या आहेन्.—घ्या—आणखी घ्या कीं एक. "

तोंड वेडेंवांकडें करीतच त्यांनीं बाळूताईच्या सुग्रपणावर योग्यसें मत प्रकट केलें व " नको-पुरे, " म्हणत हात धुतला.

" पाणी तरी दे एवढं प्यायला. "

बाळी म्हणाली, " अग पण—" एका पेल्यांत पाणी आणून ती जी थेट निघाली ती आईकडे.

" मला नव्हे, त्यांना दे. "

खरोखर बाळीचे डोळे जरी आईच्या दिशेला होते, तरी तिचा

मोर्चा होता खरोखर गोपाळरावांकडेच. पण तिच्या तिरळेपणामुळें, तिच्या नजरेंत व पायांत अशी दिशाभूल होत असे. “ इतकं का मला समजत नाहीं ? हं–हें पाणी. ” असें म्हणून व भांडें आदळून ती पाय आपटीत निघून गेली.

काकू म्हणाल्या, “लहान आहे अजून.” या वाक्यांत जोडगोळी भरलेली होती. एक तर या विधानामुळें आपल्या लेकीची अमर्यादा क्षम्य होत होती व शिवाय “ ती कांहीं फार दिवस लग्नाशिवाय राहिली नाहीं—अजून लग्नाला योग्य अशी लहानच आहे ” अशी शिफारसही त्यांत होती.

पण इकडे लक्ष पुरविण्यास पाहुण्यांना वेळ नव्हता. “ठीक, येतों.” असें म्हणून ते निघाले.

पण काकू त्यांना थांबवीत म्हणाल्या, “ हो पण मला वाटतं, एव्हांना यायचं झालं असेल घरीं. ”——

“ होय, नाहीं—पण मला भेटले होते कोर्टांत—वेळ झाला तर येईन आणखी, ” अशी थाप देऊन त्यांनीं छत्री उचलली.

दरवाज्यांत जाऊन काकू म्हणाल्या, “ पण लोकर बरीक मुंबईहून आणायला विसरूं नका. नाहीं तर ही अर्धा जीव करील. तिनं तो गळपट्टा मोठा छान विणायला घातला आहे. आणतेस का दाखवायला ? ”

घाईघाईनें जोडा घालीत गोपाळराव खालीं पहातच म्हणाले, “ असूं दे सध्यां–सबंध झाल्यावरच पाहीन. ”

“जळली मेली आठवण. शेवटीं देवाला सुपारी ठेवून जायची होती.”

आतां गोपाळरावांचा नाइलाज झाला. छत्री व जोडे ठेवून ते

देवघरांत गेले. त्यांनीं बशींत तशाच टाकलेल्या दुसऱ्या वडीसाठीं भांडत खालच्या तिन्ही मुली बसल्या होत्या. व "बाळी" लाडूचा एक बकाणा भरीत होती, तिकडे दुर्लक्ष करून गोपाळरावांनीं देवाला नमस्कार करून सुपारी ठेवली. तेवढ्या संधींत काकूंनीं लेकीनें विणलेला गळपट्टा आणला, व त्या आपणच त्याची तारीफ करूं लागल्या. लाडूचा बकाणा एका गालफडांत ठेवून बाळी खेंकसली, " हं-आई, अशाणं मळेल णा हा ! " गोपाळरावांना पुन्हा एकदां खोटें बोलण्याचा प्रसंग आला. पण काकूंच्या लेकीचें रेजिमेंट, वाढलेलें कर्ज आणि आंखडलेले सांधे लक्षांत घेऊन प्रियमप्यसत्यम् बोलण्याचा मार्ग त्यांनीं धरला व नंतर लागलीच, " आहे, या एकादशीला परततोंच आहे. " असें म्हणून त्यांनीं उंबरा ओलांडला. " यदा-कदाचित् झालोंच पुन्हा चतुर्भुज तर अशा रत्नाशीं तरी गांठ बांधायची नाहीं." अशी ज्यावेळीं त्यांनीं मनाशीं खूणगांठ बांधली, त्याच वेळीं " आज खास मनांत भरली " असें वाटून काकूंचा जीव अंमळ खालीं पडला.

गोपाळराव अर्ध्या रस्त्यावर जातात तोंच त्यांना वामनराव भेटले. आज ते तिसऱ्यांदा भेटल्यामुळें प्रथम नमस्कार करण्याचा त्यांचा विचार नव्हता. पण इतक्यांत त्यांना आपल्या चिंगीची आठवण झाली. खरोखर पहातां वामनराव आपल्या मनांत गोपाळरावांना जांवईच समजत असत. जावयाला मान दिला पाहिजे खरा, पण कनिष्ठ या नात्यानें जांवयानें अगोदर नमस्कार करावयास पाहिजे. तर इकडे गोपाळराव पडले अव्वल कारकून व वामनराव यःकश्चित् खरडे घासणारे. ( कलेक्टरच्या ऑफिसांत ते जबाबी कारकून होते. ) अशा या विलक्षण परिस्थितीमुळें घोंटाळून त्यांनीं अखेर नुसतें स्मितच केलें व म्हटलें, " आज संध्याकाळीं विसरायचं नाहीं ? "

सत्यनारायणाच्या पूजेला नाहीं कोण म्हणणार ? " येईन वेळांत वेळ काढून " गोपाळराव म्हणाले. तिनीसांजा टळण्याची वेळ होती व वामनरावांच्या भेटीचा चवथ्यांदा लाभ घेण्याचा या गडबडीच्या वेळीं गोपाळरावांचा मानस नव्हता. तरी पण वामनराव पुन्हा म्हणाले. " हें पहा, घरीं तरी कशाला जातां आतां. मी म्हणतों, इकडेच जेवून—"

" नको—नको—मला अजून थोडं काम आहे. सत्यनारायणच आहे तेव्हां नाहीं म्हणतां येत नाहीं. "

" पण कांहीं उशीर नाहीं. आपल्याला लागलीच मोकळे करूं."

" छे, माफ करा, पोथीला येईन म्हटलं आहे तर येईन. "

" पण गाडीला खूप अवकाश आहे आणि त्यांतून ती नेहमीं लेट असते—"

" बरं पाहूं " अशी पुन्हा थाप देऊन गोपाळराव चालते झाले.

" पाहूं नाहीं,—आलंच पाहिजे—" पण हें ऐकायला ते जवळ नव्हते.

वामनरावांच्या पत्नीच्या मनांत आज भोजनप्रसंगीं चिंगीला थोडी नटवून वाढायला पाठवून गोपाळरावांवर मोहिनी अस्त्र टाकण्याचा डाव होता व ' कसंही करून त्यांना राहवून घ्या ' असें, संधि साधून हळूच त्यांनीं पतिराजांच्या कानांत सांगितलें. कारण गोपाळराव रजेवर जाणार असें ऐकल्यापासून लोकांनीं नाना तर्क वितर्क केले होते, त्यांतच ते मुलगी शोधायला जाणार आहेत असा स्थानिक मुलींच्या बापांचा दृढ समज होता.

× × ×

" मिळाला ना रे बोवांनो सर्वांना प्रसाद ? " पोथी आटपून प्रसाद वांटणें संपल्यावर वामनराव म्हणाले.

" बरं, तात्यासाहेब " ( म्हणजे गोपाळराव ) " उठायचं पाय धुवायला. सर्व तयारी आहे."

" नको बोवा—खरंच. वेळ असता तर अलबत् राहिलों असतों."

" पण गाडीला हल्लीं रोज हटकून लेट होतो, " आठव्या खेपेस ते म्हणाले.

मध्येंच छोटा गणपू म्हणतो, " नाहीं हो बाबा—विसू म्हणत होता कीं परवांपासून पुन्हा अगदीं वेळच्या वेळीं गाडी येते—अन् म्हणत होता कीं उद्यांपासनं गाड्या कमी होणार आहेत."

" बरं. तुला कोणीं सांगितलं मध्यें तोंड घालायला."

पण गोपाळराव ऐकेनात. अखेर नाइलाजास्तव वामनराव म्हणाले, " बरं बुवा ! आपली मर्जी ! "

इतक्यांत माजघरांतून मोठ्यानें कोणीं म्हटलें, " चिंगे, दिलास का त्यांना प्रसाद ? "

चिंगी आंतून म्हणते, " दिला, दिला, दिला !"

" नाहीं ग आई ! " गणपू आंत जाऊन म्हणतो. " मीं एकदां त्यांना एक पान दिलं—मग बाबांनीं तिला एक द्यायला सांगितलं आणि तूं फिरून सांगितलंस. मी पहात होतों ना सारखा ? कधींग दिलास चिंगिटले तूं—"

" मग ? ते म्हणाले 'नको; मला मिळाला,' म्हणून मींच टाकला खाऊन—वायां दवडण्याऐवजीं !."

सकाळपासून पाहुणचार घेण्याची ही दुसरीच खेप नव्हती.

गोपाळरावांनीं जरी टेंडरें मागविलीं नव्हतीं तरी पुष्कळ मुलींच्या आईबापांनीं आपापला माल त्यांच्या नजरेखालीं घालून ठेवला होता व आपापले आंकडेही सादर केले होते. पण चिंगीच्या घोगरट आवाजाव्यतिरिक्त तिच्या अन्य गुणांचें प्रदर्शन करण्यास तिच्या आईला विशेष संधि मिळाली नाहीं. प्रोग्रॅमप्रमाणें एकाद्या शाळा-मास्तरची शाळा पहावयास कांहीं कारणामुळें कलेक्टर गेला नाहीं, म्हणजे फुकटच उभारलेलीं गुड्यातोरणें ज्या खिन्न मनानें मास्तर उतरतो, तीच मनःस्थिति रात्रीं चिंगीच्या डोक्यांतील सोन्याचें गुला-बाचें फूल उतरतांना तिच्या आईची झाली ! व भीत भीत " मला वाटतं त्यांचं अगोदरच जमलेलें आहे " असा संशय तिनें पतिराजांपुढें प्रकट केला. " नाहीं त्याचं नशीब ! " पतिराज म्हणाले.

* * *

दुसऱ्या संबंधासंबंधानें आपला काय निश्चय झाला आहे हें गोपाळरावांना त्यांचें त्यांनाच माहीत नव्हतें.

वाटेंत आपल्या गांवीं नाशकास ते थोडे दिवस राहिले. हो नाहीं करतां करतां मुलीही त्यांनीं पाहिल्या. त्यांतील कांहीं रूपानें व शीलानें नांव घेण्यासारख्या होत्या. पण गोपाळरावांनीं सर्व नापसंत केल्या. कां तें त्यांचें त्यांनाच माहीत. लोकांना वाटे, त्यांच्या मनांत लग्न करावयाचें नाहीं, पण भिडेखातर ते मुली पाहतात, इतकेंच. कांहींका असेना, नाशकांतील अनेक आईबापांना निराश करून त्यांचे शिव्या-शाप खात गोपाळराव मुंबईस आले.

त्यांचे मेहुणे विनायकराव स्टेशनवर उतरून घ्यायला आले होते. बऱ्याच दिवसांनीं मुंबईस आल्यामुळें ते अमळ गोंधळल्यासारखे झाले

होते. झट्दिशीं ट्रॅममध्यें बसून ते दोघेही पन्नालाल टेरेसिसमध्यें गेले. आपल्या तालुक्यांतील संथ आणि सामसूम व्यवहार व मुंबईतील गडबड आणि घाई यांतील फरक फारच त्यांना जाणवला. एम्पायर बिल्डिंग पुढील स्टँडवर नेटिव्ह ख्रिश्चन व अँग्लो-इंडियन युवती ट्रॅमकरितां अस्थिर चित्तानें उभ्या होत्या. पार्शांच्या मुली गळ्यांत पाकिटें अडकावून शाळेंत निघाल्या होत्या. तुरळक, अंगानें स्थूल अशा गुजराथी बायका नाना मनोहर अंगविक्षेप करीत ठाकुरद्वारच्या रामाला जात होत्या.

कांदेवाडीच्या बोळांतून सडपातळ आणि फिक्या अशा मुंबईच्या हवेंतील मुली हातांत बुकें व छत्र्या घेऊन धांवणें आणि भराभर चालणें यांच्या मधल्या वेगानें चंदारामजी हायस्कूलमधून येत जात होत्या. अशा या गर्दींतही जोखमीच्या कामांतून सुटल्यामुळें गोपाळरावांना मोकळें मोकळें वाटलें.

कसेबसे चार घास खाऊन विनायकराव सेक्रेटरिएटमध्यें निघून गेले. घरांत एक स्वयंपाकी, एक गडी, आक्का ( गोपाळरावांची बहीण ) व स्वतः गोपाळराव इतकीं माणसें होतीं. “ मुलं कुठें आहेत ? ” असें घरांत पाय टाकतांच गोपाळरावांनीं विचारलें होतें. पण मुलें-मुली शाळेंत गेलीं होतीं. ( शनिवार असल्यामुळें आज सकाळची शाळा होती. )

आक्का म्हणाली, “ अखेर या गरीब बहिणीच्या इथं भाऊबीज करून घ्यायला मामलेदारसाहेबांना फावलें म्हणायचं—”

“ मामलेदार ?—अजून झालों नाहीं कांहीं ! ”

“ होशील. ”

" तेव्हां म्हण—खरंच तिगस्तांच मी येणार होतों. गेल्या वर्षी—तुला माहितच—"

" हो ! तेव्हां वहिनी फारच आजारी होती. गेली बिचारी ! "

मग कोणीच बोलेना.

इतक्यांत जिन्यावर दाणदाण पाय आपटीत व विलक्षण गलबला करीत आक्कांची चमू शाळेंतून परतली. त्यांच्या पायांचा आवाज आक्कांच्या पूर्ण ओळखीचा झाला होता. " आलीं वाटतं पोरं " त्या म्हणाल्या. वहिनींच्या निधनस्मरणाचा अंत करण्यांत या पोरांची चांगलीच मदत झाली हें पाहून बहिणभावंडाला मनांतून समाधान वाटलें.

" हुरे-हुरे ! उद्यांपासून सुट्टी सुट्टी " असें तालसुरावर म्हणत सर्व मुलें आंत घुसलीं, व हा इसम पाहून त्यांनीं आपापल्या जिभेला भरदिशीं आळा घातला. " हो ! मामा-मामा " सर्व म्हणाले व गोपाळरावांच्या अंगलटीला लागले.

" अन्—ताई रे कुठं आहे ? " आक्का म्हणाली.

" ताई ! ताई कोण ? " गोपाळरावांनीं विचारलें.

" हो—तुला सांगायचंच राहिलं. मागं मी म्हटलं होतं ती—त्या आश्रमांत होती बरेच दिवस. "

" हां हां, वत्सला का काय तिचं नांव ती ना ? "

" हो, आश्रम मोडल्यापासून आमच्या येथेंच असते. तूं पाहिलीस तेव्हां होती इच्यायेवढी ( आपल्या एका मुलीकडे बोट दाखवून ). तीच या सगळ्यांना जातांना बरोबर घेऊन जाते व नीट संभाळून आणते. "

आक्काचा सर्वांत थोरला मुलगा म्हणाला, " आज शनवार ना ? तिचा स्पेशल क्लास आहे आज. "

" हो. ती शिकते आहे गाणं. " आक्कांनीं म्हटलें.

" होय का ? "

आपल्या भावाचें कोठें तरी जमविण्यांत आक्कांची कसूर होती असा मुळींच भाग नव्हता. त्याही आपल्या मनांत अनेक व्यूह रचीत होत्या. व योग्य संधि येतांच लग्नाची गोष्ट भावाजवळ काढण्याचें त्यांनीं ठरविलें होतें.

आणखी थोडें इकडचें तिकडचें बोलणें झालें. इतक्यांत ' ताई ' चंदारामजी स्कूलमधील नमुनेवाईक पोषाखांत आली. उंबऱ्याच्या आंत पाऊल टाकतांच कांहीं तरी बोलण्यासाठीं तिनें आंत सुंदर दंतपंक्ति दाखविणारे ओंठ अर्धे उघडले होते, पण गोपाळरावांना पाहून तिनें ते शब्द आंतच गिळले व खालीं पाहून ती बाजूनें जाऊं लागली. ती जर होती त्यापेक्षां वयानें लहान असती तर गोपाळराव तिच्यासंबंधीं कांहीं बोलले असते. पण स्वतःचें वय व परिस्थिति जाणून त्यांनीं तिच्याकडे पाहिलें न पाहिलेंसें केलें.

" वत्सले, ये इकडे—अग हे कोणी परके नाहींत, " आक्का म्हणाली.

उंबरा ओलांडतांच दांतखिळी बसणाऱ्या व घरांत आहे तोंवर बडबड करणाऱ्या मुलींपैकीं वत्सला नव्हती. त्यांतून आक्कांनीं असा धीर दिल्यावर काय पाहिजे होतें ?

कांहीं तरी बोलणें भाग आहे असें जाणून गोपाळराव म्हणाले, " सुटली का शाळा ? "

अत्यंत खणखणीत स्वरांत वत्सला म्हणाली, " होय, आणि आतां आठ दिवस सुटी आहे. पण प्रॅक्टिस बुडेल म्हणून क्लासाला तेवढं जायचं. "

" कसला ? गाण्याचा क्लास वाटतं ? " गोपाळरावांनीं विचारलें.

" हो. त्याला म्हणतात गाण्याचा. पण पेटी, सतार, दिलरुबा. वाटेल तें शिकावं. "

" मग तूं काय शिकतेस ? "

" गाणं अन् पेटी. "

" अरे वा ! " गोपाळराव म्हणाले.

तिऱ्हाइताशीं बोलायला ती अद्याप कचरत असे. नाहीं तर दोन तास तिनें हा संवाद चालू ठेवला असता.

शिष्टाचारापेक्षां अशा वयाच्या मुलीशीं दोन शब्द आपण जास्तच बोललों अशी शंका येऊन गोपाळरावांनीं तेथेंच आटोपतें घेतलें.

तिसऱ्या प्रहरीं चहाच्या वेळेसच आक्कांनीं अप्रासंगिकपणें लग्नाची गोष्ट काढली.

" मग जमताहे का कुठं ? "

गालाला एक नकारार्थी सुरकुती गोपाळरावांनीं पाडली.

" इथं किती तरी सांगून येताहेत. परवांच सखुआत्याबाई म्हणत होत्या. मुलगी कशी नक्षत्रासारखी आहे. हुंडा रेलचेल. आणवूं का दाखवायला ? घराणं जुनं आहे. "

गोपाळराव आक्काकडे पाहूं लागले. ते होय म्हणाले नाहींत अगर नाहींही म्हणाले नाहींत. थोड्या मिनिटांनीं एकदम कांहीं विचार येऊन ते म्हणाले, "पाहूं पुढें. सध्यां मी आलों आहे भाऊबीजेला."

आक्का म्हणाली, " खरं सांगूं ? आज संध्याकाळीं ती येणार आहे शेजारच्या मावशीच्या बिऱ्हाडीं. मी दुपारींच गड्याकरवीं निरोप पाठविला होता."

या भाषणाचा आपल्या भावाच्या मनावर काय परिणाम होतो हें ती बारकाईनें पाहूं लागली.

'होऊं नये ती गोष्ट होऊन गेली' अशा अर्थाचा सूचक शब्द गोपाळरावांनीं केला. दूध लवंडलेल्या भांडयाकडे ज्या दृष्टीनें सून पहाते त्या दृष्टीनें त्यांनीं या गोष्टीकडे पाहिलें.

" हवी तर नको करून घेऊं, पण पाहून ठेवायला काय हरकत आहे ?" आक्का म्हणाली.

इतक्यांत विनायकराव हपीसांतून आले. " मी तरी तेंच म्हणतों." ते एकदम म्हणाले.

* * *

संध्याकाळीं गोपाळरावांना घेऊन विनायकराव घराबाहेर पडतात न पडतात तोंच झट्दिशीं नथ अडकावून व पायांत जोडा घालून आक्का गोरेगांवकरच्या चाळींत निघाल्या. नळावरच त्यांना सखुआत्याबाई भेटल्या. " हं—आटपा, आत्याबाई, कुठं आहे यमू? असं हातचं स्थळ घालवूं नका. चार दागिने अंगावर घालून या घटकेला माझ्याबरोबर पाठवा तिला दाखवायला. माझा भाऊ आला आहे."

" हो—हो ! इतकी घाई कां ? अंमळ घरांत तर याल.—पण आतां फार संध्याकाळ नाहीं का झाली ?—उद्यां पाठविलं तर—?"

" पुन्हा आपलंच. मी म्हणतें ना, या पाऊलीं पाठवा. हें पहा, आज मीं त्याचं मन वळविलं आहे. उद्यां फिरला तर ? तापल्या तव्यावर होऊं द्या !" (थांबून,) " मी म्हणतें, आजची रात्र मावशींच्या इथेंच राहील."

" पण—"

" पण नाहीं न् बीण नाहीं. तुम्हांला हजारांतलं स्थळ हवं आहे ना ?—मी कांहीं आपल्याच भावाची फुशारकी मारीत नाहीं.—शिवाय मीं त्याला खोटंच सांगितलं आहे कीं ती संध्याकाळीं येणार आहे. "

मुंबईस कांहीं ठिकाणीं दाखविण्याकरितां यमूला तिच्या एका नातलगाच्या येथें—सखुआत्याबाईच्या येथें ठेवलें होतें. व सखुआत्याबाई व आक्का या बहिणीप्रमाणें वागत असत.

" अन् हें पहा–तें पोलकं कशाला ? छेः ! आपलं जुन्याच वळणाचं असूं द्या सगळं. वेणी घालूं दे. मुंबईच्या सारखी नका सजवूं तिला. आलं ना ध्यानांत ?"

तिनीसांजाच्या वेळीं विनायकरात्र गोपाळरावांना घेऊन परतले. श्रीपतरावांनीं—मावशीचे यजमान—त्यांना गॅलरींत अडवलें व ' या अंमळ गप्पा मारायला ' असें म्हणून आपल्या खोलींत नेलें. थोडया वेळानें त्यांनीं चहा करायला सांगितला व यमू चहा घेऊन बाहेर आली.

" कां यमुताई, " श्रीपतराव म्हणाले, " ठीक आहे ना ?"

यमूनें किंचित् स्मित करून होकार दर्शविला.

" घरची मंडळी खुशाल ? "

" हो. "

" काय ग, तुझ्या भावाला म्हणे नोकरी लागली ?"

पुन्हा तिनें स्मित केलें.

" कुठें ? " श्रीपतरावांनीं विचारलें.

" मला नाहीं माहीत. "

" बरं, पगार बिगार ? "

" मला नाहीं ठाऊक. "

" इथं आल्यापासून शाळे—बिळेचा त्रास नाहीं ना ? "

" तिथं तरी कुठं होता. "

वगैरे.

अशा तऱ्हेनें श्रीपतरावांनीं गोपाळरावांसमक्ष यमूची परीक्षा घेतली व पानसुपारी झाल्यावर पाहुण्यांची रवानगी केली.

रात्रीं जेवतांना विनायकराव वत्सलेला म्हणाले, " यमूच्या भावाला म्हणे नोकरी लागली—ऐकलंस का तूं ? "

" हो—मिलिटरी अकाउंटस्‌मध्यें. पगारही म्हणतात हल्लीं तेथें चांगला मिळतो. त्याला ५० का ६० कायसा आहे. "

" तुला काय माहीत ? "

" मीं विचारलें—नानासाहेबांना. "

" हं हं. "

जेवणानंतर सर्व मुलें वत्सलेला म्हणालीं, " ताई, तूं म्हणालीस ना शनिवारीं रात्रीं पेटी वाजवा म्हणून. मग दे उघडून आतां पेटी. "

" अरे पण आज मामा आले आहेत ना? त्यांना कटकट होईल. "

गोपाळराव म्हणाले, " वाजवूं दे वाजवूं दे. "

कांहीं वेळानें विनायकराव म्हणाले, " खरंच वत्सले, तें तुझं नेहमींचं पद वाजवतेस का ! मामाही ऐकतील. "

वत्सला पेटी वाजवूं लागली.

रात्रीं नऊ वाजण्याचा सुमार होता. टेबलावरील दिव्याचा प्रकाश मागून येऊन वत्सलेच्या तोंडाचा एकच भाग प्रकाशित करीत होता. साध्या काळसर अंगाच्या व अरुंद पांढऱ्या कांठाच्या पातळाच्या आंतून पोलक्याची झालर अर्धस्फुट दिसत होती. मानेवर सैल बुचडा लोळत

होता. त्या प्रकाशांत तिच्या तोंडावर व मानेच्या बाजूवर निघालेले घर्मबिंदु दिसत होते. तिची पातळ व लांब बोटें काळ्या आणि पांढऱ्या सुरावरून विजेच्या गतीनें इकडून तिकडे सरकत होतीं व ओठ गाण्याच्या चालीप्रमाणें हलत होते.

सर्व श्रोते डोलूं लागले.

पेटी थांबल्यावर वत्सलेनें पदरानें घाम पुसला व मागें पाहिलें. गोपाळरावांची व तिची दृष्टादृष्ट झाली. पण शिफारसपर कांहींही न बोलतां, त्यांच्या चेहऱ्यावर म्लानता दिसूं लागली, व कपाळावर सुरकुत्या उठल्या. ते कसला विचार करीत होते ?

इतक्यांत विनायकराव म्हणाले, " वाः ! फारच छान. "

इकडे पेटीचा नाद ऐकून श्रीपतराव तेथें आले. " यमूला बोलवा रे. तिला येते का पेटी ? " ते म्हणाले.

चोराला धरून आणावें त्याप्रमाणें यमू तेथें आली. पण तिला गाताही येत नव्हतें व वाजवितांही येत नव्हतें. नंतर वत्सलेनें आणखीं दोन-चार पदें वाजविलीं. हळू-हळू तिचे ओंठ जास्तच हलूं लागले व ती गुणगुणूं लागली.

" हं—आम्हांलाही ऐकूं द्या कीं ? " श्रीपतराव म्हणाले.

वत्सला गाऊं लागली. तिचा आवाज बारीक पण खणखणीत होता व अतिशय उंच चढे. ताना, आलाप आणि स्वर यांनीं ती स्वतःच मोहून गेल्यामुळें ती पहिल्यापेक्षां मनोहर दिसूं लागली.

इकडे यमूनें हळूच तेथून पाय काढला !

मुलें निघून गेल्यावर आक्कानें हळूच भावास म्हटलें, " पडली का पसंत ? "

खालीं पहात गोपाळराव म्हणाले, " हो—पण तूं दाखवायला आणली होतीस ती नाहीं ! "

" म्हणजे ? " हा आक्कांचा चमत्कारदर्शक शब्द ऐकायला गोपाळराव तेथें नव्हते. पण आक्कांच्यानें राहवेना. पाठोपाठ त्याही गॅलरींत गेल्या. " म्हणजे " त्या पुन्हा म्हणाल्या, " खरंच का ? खरंच का ? मग तर सोन्याहून पिवळं झालं. आधींच माहीत असतं तर—! पण मला वाटलं तुझ्या मानेवर कुणी कुऱ्हाड ठेवली तरी तूं अशी सुधारक बायको करणार नाहींस ! "

तोंडाचे दोन्ही कोंपरे खाली ओढून ते विचारमग्न झाले.

" पण तुमचं पटेल का ? " थोडें मनापासून व थोडें थट्टेनें आक्का म्हणाली.

गोपाळरावांनीं कपाळावरून हात फिरवला.

" सांगूं का तिकडे " आक्का म्हणाली. पहिल्या पत्नीची आठवण होऊन भावाच्या तोंडावर म्लानता आली असावी असा तिनें तर्क केला.

सर्व स्नायु घट्ट करून गोपाळरावांनीं कण्हल्यासारखा होकार प्रदर्शित केला.

* * *

गोपाळराव आपल्या तालुक्याचे गांवीं परत येण्यापूर्वींच या लग्ननिश्चयाची वार्ता तेथें जाऊन पोहोंचली होती. कोणी म्हणत ते पुनर्विवाह करणार आहेत. कोणी म्हणाले त्यांचें लग्न झालें सुद्धां. वामनरावांनीं शंका प्रदर्शीत केली कीं 'कार्तिकांत कसं लग्न होईल ?' पण त्यांच्या पत्नीनें त्यांना मोडून काढलें, " इश्श ! त्यांना कशाला

हवा आहे मुहूर्त न् बिहीर्त ! गुपचुप प्रार्थनासमाजांत जाऊन घातला असेल हातांत हात, झालं. आहे काय अन् नाहीं काय ! मला नव्हतं वाटलं बाई—!" काकूंचा मात्र बरेच दिवस या बातमीवर भरंवसा बसेना. आपल्या चिंगीनें त्यांना पादाक्रांत केलें आहे असा त्यांचा पूर्ण विश्वास होता. पण गोपाळरावांच्या पत्नीविषयीं जसजशी जास्त व बारीक बोलाचाल सुरू झाली तसतसा त्यांचाही धीर खचूं लागला. 'आजपर्यंत शेराचे लाडू चारले, ते व्यर्थच म्हणावयाचे !' त्या आपल्याशीं म्हणाल्या. कोर्टांतील पट्टेवाला गोपाळरावांच्या ब्राह्मणाला म्हणाला, "आतां बूट-इष्टाकिण्या घालणारी धनीण येणार म्हणे तुम्हांला !" एकानें तर अशी कंडी पिकवली कीं ती गाणारीण असून पूर्वीं एका नाटक कंपनींत होती !

तीन महिन्यानंतर रमाबाईंचा—पूर्वींच्या वत्सलेचा, गृहप्रवेश झाला. तिच्या आगमनानें गांवांत जरी बरीच खळबळ उडाली तरी तें आगमन कोणालाच फारसें इष्ट अगर प्रिय वाटलें नाहीं. तें खेडें-गांव पाहून रमाबाईंच्या मनावरही कांहीं चांगलासा ठसा उमटला नसता, पण सारा जन्म मुंबईस काढल्यामुळें हा फरक कांहीं वाईट नव्हता. ती मोकळी हवा आणि शांतता, 'आपलें' घर, यामुळें ती अधिकच आनंदी दिसूं लागली. तिच्या येण्याची गांवांत चाहुल लागतांच, जो तो तिला पाहण्याकरितां अगदीं उत्सुक झाला. डिटेक्टिव्ह जसे सहजगत्या म्हणून राजरोस चोराच्या पाळतीवर असतात तसे त्या गांवचे लोक उभे होते. गाडीचा आवाज ऐकतांच टारगट मंडळी आपापलीं कामें टाकून दारापुढील ओट्यावर येऊन उभी राहिली. कित्येकांना वाटलें ती झगा घालून तर नाहीं येणार ?

" माझी येवढी सोन्यासारखी मुलगी टाकून अशी कोणची रंभा हा करून आला आहे " हें जाणण्याची काकूंना भयंकर उत्कंठा लागली होती. व ती आली असें समजताच त्या गवती चहा आणण्यासाठीं म्हणून गोपाळरावांच्या परसांतील बागेंत गेल्या. पण वत्सला कांहीं त्या बाजूला गेलीच नाहीं.

मुंबईहून नाशकापर्यंत तिला एकटीलाच पाठविण्यांत आलें होतें. पण हाच मार्ग आपल्या गांवापर्यंत येण्यास ठीक नाहीं असा सूज्ञ विचार करून लगबगीनें गोपाळराव नाशकास जाऊन तिला स्वतः घेऊन आले. आगगाडींत ते दोघे एकटेच राहिल्यावर गोपाळराव तिला हलकेच म्हणाले, " जोडे नाहींत का ? बूट कशाला तेथें खेडेगांवांत ?—घाण होतील, दुसरं कांहीं नाहीं. " गोपाळरावांच्या म्हणण्याचा खरा अर्थ तिच्या ध्यानांत आला कीं नाहीं कोण जाणे पण प्रतिकार न दर्शवितां तिनें बूट आणि पायमोजे काढून गाठोड्यांत खुपसले व जोडा घातला.

नव्या घरचीं सूत्रें हातांत घेण्यांत व इतर बारक्या-सारक्या गोष्टी समजावून घेण्यांत एक आठवडा गेला. तेवढ्या अवधींत काकूंच्या पांच-सात फेऱ्या गोपाळरावांच्या बागेंत झाल्या. ताप-खोकल्यावांचूनच त्यांच्या मुलींना गवती चहा प्यावयास मिळे. काकूंना वाटे आपण वडील तेव्हां, रमेनें प्रथम आपल्या घरीं यावें अगर बागेंत आपणांस पाहिल्यास तिनें होऊन प्रथम बोलावें. एक-दोन वेळां रमेनें त्यांना पाहिलें पण तिकडे लक्ष दिलें नाहीं. " कोण येत असते ही बाई-आपल्या बागेंत ? " तिनें ब्राह्मणास विचारलें. " चीफ-साहेबांच्या बाईसाहेब आहेत हो त्या. " ब्राह्मण

म्हणाला, " पूर्वी त्यांचं नेहमीं येणं जाणं असे. " " चीफसाहेब " कोणाला म्हणतात हें अद्याप रमेला माहीत नव्हतें.

या आठवड्यांत तिची एक जुनी ओळख निघाली. त्या गांवांत जे डॉक्टर होते त्यांची गतधवा बहीण पूर्वी वत्सलेबरोबर शाळेंत शिकत होती. त्यांचें एकमेकांच्या घरीं जाणेंयेणें सुरू झालें होतें.

या आठवड्यांत गोपाळराव दोन तीन वेळां आपल्या नूतन पत्नीला म्हणाले, " तूं बाईसाहेबांना भेटायला केव्हां जाणार ? " प्रथम बाईसाहेब कोण, तें तिला माहीत नव्हतें. ' रावसाहेबांचें कुटुंब', गोपाळराव म्हणाले. पण यामुळें तिला विशेष बोध झाला नाहीं. चीफसाहेब, रावसाहेब व बाईसाहेब हे सर्व एकाच माळेचे मणी असावेत असा तिनें तर्क केला. ' रावसाहेब म्हणजे मामलेदारसाहेब,' त्यांनीं फोडून सांगितलें. " अस्सं ? " ती म्हणाली व तें बोलणें तितकेंच राहिलें. दुसऱ्या खेपेस जेव्हां गोपाळरावांनीं तो प्रश्न काढला तेव्हां ती म्हणाली, " तें काय म्हणून ! माझी न् तुमच्या ' बाई-साहेबांची ' नाहीं बाई ओळख ! "

" नसली तर होईल " ते म्हणाले.

" पण काय म्हणून उगीच ओळखी तरी वाढवायच्या. त्यांना जर माझी येवढी तहान लागली असली तर येतील इथं. "

" लोकांच्याविषयीं असं बोलूं नये. हा शिष्टाचार आहे. रीत-रिवाज आहे. समजलीस ?—कोणीं ऐकलं तर ? "

" ऐकलं तर काय, बरंच झालं. आडून ऐकणाऱ्यांना आपली किंमत कळेल. "

गोपाळराव पायाला वेढा घालून बसले व विचारमग्न झाले. तिसऱ्या खेपीं ते म्हणाले, " मग केव्हां जाणार तूं तिकडे ? "

" हें काय बाई ? हा कसला भलताच आग्रह ? वयानं त्या केवढ्या, मी केवढी—बोलूं तरी काय मी त्यांच्याशीं ? "

" वयानं त्या वडील—आणि मानानंही—म्हणून तर आपण कमीपणा पत्करून त्यांच्याकडं जायचं. "

" मानानं—मानानं ? म्हणजे मी कोणीच नाहीं ? मामलेदारीण असली तर आपल्या घरची ! ती आपल्या घरची धनीण तर मी पण आपल्या घरची गव्हर्नरीण आहें. "

गोपाळरावांच्या कपाळाला आठ्या पडल्या.

" रागवायचं नाही गडे. तुमच्या करतां हवं तर मी जाईन. "

" तसं का म्हणेनास. " ते आढ्याकडे पाहून म्हणाले व लगेच डोक्याला रुमाल गुंडाळून ते कामाला बाहेर निघून गेले.

आजच एकदां हें कष्टमय कर्तव्य उरकून यावें असा तिनें विचार केला. जायला अजून अवकाश होता म्हणून एक पुस्तक घेऊन ती वाचीत बसली. इतक्यांत जोडवीं घातलेल्या पायांचा व सळसळणाऱ्या बांगड्यांचा आवाज तिला ऐकूं आला. तिनें वर पाहिलें, तों दारांत एक मध्यम वयाची बाई किंचित् स्मित करून उभी आहे असें तिला दिसलें. बुकांत बोट घालून रमेनें तें मिटविलें व ' कोण—या ' ती म्हणाली.

काकू—कारण त्या काकूच होत्या—दांत विचकून म्हणाल्या, "मी—कसं काय, ठीक आहे ना ? "

रमेनें एका खुर्चीकडे बोट करून म्हटलें, ' बसा. '

पण काकू आजन्मांत खुर्चीवर बसल्या नव्हत्या.—हो—त्यांचा

एक किडका दांत काढते वेळीं डॉक्तरनीं त्यांना एका उंच खुर्चीवर बसविलें होतें. खुर्चीचा मान न घेतां त्या खालीं जमिनीवर बसल्या. रमाही मग बूक टेबलावर ठेवून खालीं बसली.

"आलें होतें बसायला," काकू म्हणाल्या, "आज आठ दिवस येईन येईन म्हणतें पण मेला वेळच कसा तो होत नाहीं. त्यांतून आवडीला येतोहे चार दिवस ताप. आज म्हटलं वेळांत वेळ काढून जायचं."

पण आवडी कोण आणि तिचें नांव घेणारी ही बाई कोण ह्याचा तितकाच उलगडा रमेला झाला होता. शेवटीं रमा म्हणाली, "मी—अं—ओळखलं नाहीं तुम्हांला."

"खरंच, कुठून ओळखणार. लहान मुलींना तितकी नाहीं आठवण रहात. एक दोनदां आलें होतें मी परसांत—गवती चहा न्यायला—पण तेव्हां म्हणतात ना," त्या खोंकल्या.

"हो—पाहिल्यासारखं वाटतं खरं." चीफसाहेबांच्या या पत्नी हें तिला आठवलें. चीफसाहेब कशाशीं खातात हें जरी तिला समजलें नव्हतें तरी हें कोणी तरी बडें प्रस्थ आहे इतकें तिला वाटलें व काकूंच्या चंद्रकळेनें व मोठाल्या मोत्यांच्या नथेनें रमेची खात्री केली.

आपण साऱ्या दुनियेला माहीत आहोंत असा काकूंचा समज होता. अर्थात् स्वतःविषयीं जास्त उलगडा त्यांनीं केला नाहीं.

नंतर त्यांनीं तिचें नांव-गांव, भाऊ किती आहेत, आईबाप कोठें आहेत वगैरेची सर्व बारीक चौकशी केली. "बहीण—भाऊ कोणी नाहींत," रमा म्हणाली व आईबापांबद्दल प्रश्न निघाला तेव्हां तिनें म्हटलें, 'चार वाजले कां? मला जरा बाहेर जायचं आहे.' असें म्हणून ती कुंकूं आणावयास उठली. कारण रमेला स्वतःलाच आपल्या

आईबापांबद्दल फारशी माहिती नव्हती. इकडे मामलेदारांच्या घरीं जाण्याचीही वेळ झाली.

" भाजी-बिजी निवडायची असली तर आणा कीं इकडे," काकू म्हणाल्या.

" नाहीं. मी बाहेर जाणार आहें."

" कुठें ? देवाला ? आपण बरोबरच जाऊं. "

रमेच्या मनांत ' फारशी चवकशी करतां ' असें विचारावयाचें आलें होतें. पण तें दाबून ती म्हणाली, ' नाहीं—बाईसाहेबांच्या इथें.' ' बाईसाहेब ' या शब्दावर तिनें जोर दिला.

" वा: देवच पावला म्हणावयाचा मला. पण तिकडे जायला या आठा-दिसांत वेळ झाला नव्हता. "

नाइलाजास्तव रमा म्हणाली, "बरं बसा. मी लुगडं बदलून येतें."

या वेळीं तिचा अगदीं साधा पोषाख होता. एक महेश्वरी लुगडें व धारवाडी खणाची चोळी.

ती जेव्हां परतली, तेव्हां काकूंना ओळखतां आली नाहीं. रमेनें वेळ बराच लावला. पण तेवढ्या अवधींत काकू स्वस्थ बसल्या नाहींत. आपल्या संधिवाताकडे लक्ष न देतां त्यांनीं त्या खोलीची बारकाईनें तपासणी केली. रमाबाई येतील त्या एकादें उंची रुंद कांठाचें लुगडें नेसून व चार दागिने घालून अशी काकूंची अटकळ होती. पण पहातात तों ती एक रंगी-बेरंगी स्वस्त पातळ नेसलेली. त्याला कांठाचा संशय देखील नव्हता, अंगांत एक झालरीचें रेशमी पोलकें. पायांत बूट आणि पायमोजे व हातांत छत्री. मानेवर सैल बुचडा व त्यांत एक हेअर-पिननें अडकविलेलें छोटेंसें फूल. एक सुंदर रुमाल ट्रंकेंतून

काढून तिनें आपल्या पोलक्याच्या चिमुकल्या खिशांत अगर खिशा-सारख्या दिसणाऱ्या एका फटींत कोंबला, व एक नाजुकशी छत्री उचलीत ती म्हणाली, ' चला ! '

हा अवतार पाहून काकूंच्या अंगावर शहारेच आले व अशा छाकटीबरोबर रस्त्यांतून जाणें अत्यंत गर्ह्य होणार हें जाणून निसटण्याचा त्यांनीं बेत केला.

आवडीपेक्षां तोऱ्यामुळेंच रमेनें हा पोषाख केला होता व अशामुळें आपलें स्वातंत्र्य प्रकट करावयाचें होतें. बाईसाहेब ' मानानें ' मोठ्या, हें तिच्या मनांत डांचत होतें.

त्या दोघी घराबाहेर पडतात तोंच मामी ( वामनरावांचें कुटुंब ) आपल्या मुलींपैकीं दोघींना घेऊन जात होत्या त्या त्यांना भेटल्या. त्याही रमाबाईंना भेटण्याकरितांच चालल्या होत्या. काकू त्यांना पाहून थांबल्या व रमा तशीच पुढें जाऊं लागली. " देवानंच पाठविलं हो तुम्हांला " काकू म्हणाल्या व रमेला उद्देशून तेथूनच ओरडून म्हणतात, " तुम्ही व्हा पुढें मी आलेंच. " पण त्यांनीं आपल्या म्हणण्याप्रमाणें केलें नाहीं.

" कां—काय वर्तमान आहे ? " मामी डोळे मिचकावून म्हणाल्या.

" हें—पाहिलंत ना भूत ! " काकू म्हणाल्या.

" अन् हा अवतार निघाला कोठें तोऱ्यानं ? "

" बाईसाहेबांकडे. "

" बाईसाहेबांकडे ! " एकादी भयंकर पण होणारी गोष्ट ऐकली म्हणजे जशी आपली मुद्रा होते तशी मामींची झाली.

रस्त्याच्या मध्यभागीं उभें राहून त्यांचें बोलणें चाललें होतें.

" लक्षण ठीक दिसत नाहीं. " मामी म्हणाल्या.

" पण तात्यासाहेबांना चालतं का हें ? "

" मला नव्हतं वाटलं बाई तेव्हां—इतक्या थराला जाईल ! "

" बाकी, दुसरेपणाची आहे—तेव्हां ती डोक्यावर बसणारच. " आपलेंच भाषण त्यांनीं पुढें चालविलें.

मामीही आपल्या भाषणाचा धागा घेऊन म्हणाल्या, " मी समजत होतें, ते जुन्या चालीरीतीचे आहेत—"

" माझी बाळी कशी शोभली असती या घरांत. दिंडींतून जातांना सुद्धां तिला वांकावं लागत नाहीं—इतकी ती लहान आहे. आणि तिला प्रत्येक दाराशीं वाकावं लागतं. मला वाटतं तात्यासाहेबांहून ती उंच असेल. "

खरें पाहिलें तर काकूंना जितका संधिवात तितकेंच उंच वाढणें रमेला अपरिहार्य होतें.

" गाणारीण आहे म्हणतात—तेंच खरं असेल. "

" मी पाहिलं तेव्हां बूक वाचीत होती. आधींचीला नव्हता हा चारगटपणा माहीत. चिंगीला तर बूक पाहिलं की पडसें येतें. "

गोपाळरावांच्या सोयरीकीसंबंधीं पूर्वी जरी काकू आणि मामींमध्यें चढाओढ होती तरी आतां दोघींचें ऐक्य झाल्यामुळें बाळीपुढें आपल्या चिंगीचें घोडें घालून लाथांचा सुकाळ माजविणें मामींना इष्ट वाटलें नाहीं.

नंतर कंबर दुखूं लागल्यामुळें 'देवळांत भेटालच' असें म्हणून काकू व मामी विरुद्ध दिशेला निघून गेल्या.

* * *

रात्रीं जेवण झाल्यावर रमा पतीला म्हणाली, "आतां तरी आहे का अंमळ रिकामपण ? कां आजही जायचं आहे दिवे लावून काम करायलां ?"

"नाहीं. आज अगदीं मी तुझा आहें. इतके दिवस त्या रिपोर्टांच्या कामांत मी गुंतलों होतों."

"खरंच सांगा, आज साऱ्या दिवसांत पांच मिनिटं तरी बोलायला घरीं असायचं होतं का !"

"पण आतां सारी रात्र आपली आहे ना ? कामामुळं नाहीं वेळ होत."

"वा: ! म्हणजे दिवसभर काम करून शिणल्यावर आपल्याला मी जागत ठेवायचं का ? खरंच हिंडून हिंडून पाय देखील भरून आले असतील. आतांशा पहिल्यासारखी प्रकृति दिसत नाहीं."

कसली तरी आठवण होऊन गोपाळरावांचा चेहरा म्लान झाला, "नाहीं, कांहीं विशेष नाहीं. त्यांतून सरावही झाला आहे." पण या बोलण्याकडे त्यांचें फारसें लक्ष दिसलें नाहीं. पायाला तेढी घालून ते बसले व पुन्हा विचारमग्न झाले.

"इकडे करतां का पाय ! अमळ चेपतें तरी," असें म्हणून तिनें एक पाय हातांत घेतला.

गोपाळराव खडबडून जागे झाल्यासारखे झाले व पाय सोडवून ते म्हणाले, "छे छे ! इतकें नाहीं कांहीं होत. राहूं दे."

पण तिनें हट्ट धरला.

"एका अटीवर मी कबूल आहें" ते म्हणाले.

"कोणची ती !" ती हसून म्हणाली.

पण गोपाळराव गंभीरपणें म्हणाले, " पण तूं ऐकशील का ?

" इश्श ! हें काय विचारणं ? अगदीं अक्षरश: "

आपला मजकूर कोणत्या शब्दांत घालावा याची जुळणी करून ते म्हणाले, " तूं आपले बूट होते तसे गाठोड्यांत बांधून ठेवशील ? "

रमेला वाटलें होतें त्याहून ही अट अगदीं निराळ्या तऱ्हेची होती. " बूट ? आणि गांठोडयांत ? ते कां ? "

" कारण बुटांची येथें जरूर नाहीं. " ते कठोरपणें म्हणाले.

प्रथम ती कांहीं बोलली नाहीं. व याउप्पर वाद घालणेंही तिला इष्ट वाटलें नाहीं. " इकडे आवडत नसलं तर नाहीं बापडी वापरणार. " असें म्हणून व खालीं पाहून ती निमुटपणें पाय चेपूं लागली. पण गोपाळराव तिचे हात बाजूला करून प्रेमानें म्हणाले, " पुरे, या नाजुक हातांना कष्ट होतील. "

बुटांची गोष्ट मग दोघेही विसरले व दीड-प्रहर रात्रीं झोंपी गेले.

दुसऱ्या दिवशीं तिसरेप्रहरीं रमा सुशीलाताईंच्या घरीं गेली. येथें जाण्यांत तिला आणखी एक आमिष होतें. डाक्तरांच्या घरीं बाजाची पेटी होती व स्वत: डाक्तर आणि त्यांची बहीण दोघेही गात असत. रमा त्या दोघांपेक्षांही सरस पेटी वाजवी म्हणून धडा घेण्याकरतां सुशिलाही तिला आग्रह करून बोलावीत असे. रमेची व डाक्तरांची अर्थात् एव्हांना ओळख झाली होती. तीं तिघें जमलीं म्हणजे नाना विषयावर वाद-विवाद करीत व तो वेळ रमेला मजेदार जात असे. त्यांतून गोपाळराव घरीं क्वचितच असत. व घरीं असले तरी कांहींना कांहीं काम त्यांच्यामागें असे. त्यामुळें रमेला घरीं मुळींच करमत नसे. रात्रीचेही केव्हां केव्हां गोपाळराव कामाला जात, मग रमा पुस्तक

वाचीत त्यांच्या येण्याची वाट पाही व बरीच रात्रपर्यंत आले नाहींत म्हणजे तिला झोंप लागे.

" अलीकडे तुला आलं होतं कां नानासाहेबांचं पत्र ? " सुशीलेनें विचारलें.

" नाहीं बाई. "

" आम्हांला आजच आलं. त्यांनीं दीड महिन्यांची रजा घेतली आहे व दोन-तीन दिवसांत ते येथें येतील. "

रमेला अत्यंत आनंद झाला. व तें पत्र तिनें स्वतः वाचलें. "पण हार्मोनियमबद्दल यांत कांहींच उल्लेख नाहीं. " आहेर म्हणून ते रमेला एक हार्मोनियम घेऊन देणार होते.

नंतर रमा पेटीवर बसली व सुशीला गाऊं लागली. सुशिलेचा आवाज बायकांच्या गळ्यासारखा बारीक नसला तरी मधुर होता. व तिला तानासुरांची बरीच माहिती होती. रमा तिची सांथ चांगली करी. इतकेंच नव्हे पण पदरच्याच आणखी थोड्या तानांची भर घाली. त्यांचें गाणें ऐकून डाक्तर निजले होते ते जागे झाले व चूळ भरून तेथें आले. रमेनें त्यांना गाण्यास विनंति केली. पण चहा प्यायल्याखेरीज आपली आवाजी लागायची नाहीं असें त्यांनीं साफ सांगितल्यामुळें सुशीला चहा करावयास गेली. डाक्तर येतांच रमेनें वाजविणें थांबवलें होतें.

" ताई तुमचं तें पेटंट पद वाजवा पाहूं. " डाक्तर म्हणाले.

" इश्श ! तेंच तेंच वाजवायचा मला कंटाळा येतो बाई ! " पेटीच्या सुरावर हात आपटून ती म्हणाली.

" नाहीं. पण तें पद फारच नामी आहे. मला किनई कितीदां ऐकलं तरी प्रत्येक वेळेला त्यांत नाविन्यच वाटतं. वाजवाच. "

रमा वाजवूं लागली. " बाळपणींचा काळ सुखाचा........... "

डाक्तर एकचित्तानें ऐकूं लागले. व मधून मधून आपल्याशींच ' अहाहा ! वा ! ' असे उद्गार काढीत होते.

इतक्यांत छोटा गणपू धाड्दिशीं दार उघडून आला.

" चला दादासाहेब लवकर, " धापा टाकीतच तो म्हणाला, " आईनं लवकर बोलावलं आहे. "

" कां रे ? " स्वस्थपणें डाक्तर म्हणाले.

" चिंगीला ताप आला आहे न् ती कसंसंच करते आहे. "

" बरं आलों आ ? "

" आलों नाहीं, असाल तसे या असं सांगितलं आहे आईनं. "

" आलोंच तुझ्यामागं, एका तासात. "

रमा मागें वळून म्हणाली, " माझ्याकरतां नका आळस करूं ! ती जर फार आजारी असली तर या पावलींच—"

पण तिला ज्यास्त बोलूं न देतां डाक्तर गणपूला म्हणाले, " बरं चालूं लाग—"

गणपू निघून गेल्यावर डाक्तर म्हणाले, " अहो, ह्या हावऱ्या लोकांशीं वागणं मोठें कठीण ! उगीच तिला कुठं मलेरियाचा अॅटॅक आला आहे, तर तेवढ्यांत सकाळपासून तीन वेळां बोलावणं पाठविलं. परिचय म्हणून मी व्हिजिटची फी घेत नाहीं त्याचा उपकार असा फेडतात. चालूं द्या तुमचं—"

पण पहिल्यासारखा रंग पेटीला चढेना. इतक्यांत चहाही आला.

चहा पिणें झाल्यावर डाक्तर गाऊं लागले. पण इतक्यांत रमा म्हणाली, "मला वाटतं, तिकडे एकदां जाऊन आलां असतां तर बरं झालं असतं."

" छे, छेः ! फारच तुम्ही ह्या बुवा, ताई. जाईन घटकाभरेनें डिस्पेन्सरीला जातां जातां. "

डाक्तर गाऊं लागले. त्यांचें गायन गवई थाटाचें होतें. थोडी रागदारी झाल्यावर सुशिला उठून, रमा पुन्हा पेटीवर बसली. पुन्हा डाक्तर गाऊं लागले, तोंच पुन्हा ज्यास्तच जोरानें दरवाजा उघडून गणपू पुन्हा आला. " चला ना लौकर. चिंगीपेक्षां आईचाच जीव थोड-थोडा होत आला आहे. जेवीत असलां तर आंचवायला या म्हणाली आई. "

अखेर गाणें थांबवून डाक्तर निघाले. व रमाही मग आपल्या घरीं गेली. तेथें नानासाहेबांचें पत्र तिची वाट पहात होतें. त्यांतही रजा घेऊन डाक्तरांकडे येण्याचा मजकूर होता व येतांना ' पेटी आणतों ' असें म्हटलें होतें. रमेचा आनंद गगनांत मावेना. पेटीचा तिला लहानपणापासून नाद होता. ही गोष्ट तिनें अत्यंत उल्हसित अंतःकरणानें पतीला सांगितली; क्षणभर नापसंतीची छटा पति-राजांच्या तोंडावर उमटली. पण लगेच ती बदलून त्या ठिकाणीं हास्य आलें. ' अरे वा ! खरं का काय ? ' एवढेंच ते म्हणाले.

" पण हे नानासाहेब कोण ?—मुंबईसही एकदां त्यांचें नांव मीं ऐकलें होतें तुझ्या तोंडून. " कांहीं वेळानें संशयित मुद्रेनें ते म्हणाले.

" आमचे मास्तर. आमच्या घरची खूप ओळख. बी. ए. झाले आहेत. "

" ते वाजवतात का पेटी ? "

" तर. पेटी, सतार, तबला—सगळयांत प्रवीण आहेत; गातात पण."

भावी अरिष्ट सूचक अशी गोपाळरावांची चर्या झाली, व पायाला त्यांनीं तेढी घातली.

*　　*　　*　　*

काकू आणि मामी नदीवर भेटल्या.

मामी म्हणाल्या, " कां काकू, कशी आहे लेक ? "

" पडली आहे आतां स्वस्थ अमळ. "

" ऐकलीत का मामी परवांची गम्मत ? "

" काय बाई ? " मामींनीं विचारलें.

" सगळया गांवाला ठाऊक झाली आहे अन् तुम्हांला नाहीं ? "

" आज दोन दिवसांत भेटलाहेत कुठं तुम्ही. "

" फार्सच म्हणायचा. " (घागर खालीं ठेऊन) " परवां ती मडम गेली होती ना बाईसाहेबांकडे ? "

" बरं मग ? "

" चांगलीच फजीत होऊन आली. बाईसाहेबांनीं पहिल्यानें कांहीं ओळखली नाहीं तिला, पण अंदाजावरून मग कळलं. तिचे बूट अन् इष्टाकिण्या पाहून बाईसाहेब बसल्या होत्या ओटीवर चोळी शिवीत.—हिचा हा थाट पाहून तिला पाट बसायला देण्याऐवजीं ' खुर्ची तरी आणा एक मडमसाहेबांना ' त्या म्हणाल्या ! पण खुर्ची कोणीं आणली नाहीं व मडमसाहेब आपण होऊनच झोंपाळ्या-वर बसल्या. "

" इश्श ग बाई ! " आपली घागर या कडेवरची त्या कडेवर करून मामींनीं एकदां नाक ओढलें.

"'करंज्या खाल का दोन? इथं सोडावाटर मिळत नाहीं आमच्या खेडुल्यांत'! बाईसाहेब म्हणाल्या. मडम म्हणाली, 'नको, कांहीं जरूर नाहीं. मी आतांच चहा घेऊन निघालें आहे'!"

पुन्हा कमरेची बदली करून एक आश्चर्यदर्शक आवाज मामींनीं केला.

"मग हो ना करून दोन साखरपऱ्याच्या वडया तिनं खाल्ल्या. बाईसाहेब म्हणाल्या, 'मेल्यांनो, साभण आणि टुवाल तरी आणा कोणी!' पण तिनं आपल्या पोलक्याच्या खिशांतून एक हातरुमाल काढला व त्यानंच हात व तोंड पुसलें. बाईसाहेबांच्या प्रश्नाला ती साक्षीदारासारखी उत्तरं देत होती. कांहीं वेळानें झट्‌दिशीं मनगट वर करून तिनं चिमुकल्या घड्याळांत पाहिलं, व 'बरं येतें' म्हणून ती उठलीच. बाईसाहेबांनीं विचारलं, 'कुंकूं लावतां का तुम्हीं?' व तिच्या अगदीं जवळ जाऊन बारकाईनं कपाळाकडे पाहिलं."

दोघी हसूं लागल्या. मामींनीं पुन्हा घागरीचें स्थानांतर केलें व काकूंची कंबर मोडून आल्यामुळें त्यांनीं कमरेला हात लावला. नंतर पुन्हा एकदां पदर नीट खोवून व ओंचा पिळून त्यांनीं घागर उचलली.

मामी म्हणाल्या, "मला वाटतं, हिच्या अशा लक्षणानं—"

पण काकू मध्येंच म्हणाल्या, "अहो येवढ्यानें काय झालं आहे? जळ्ळं सांगायचंच राहिलं!" पुन्हा घागर खालीं ठेवून व पदर सोडून, "आतां तिला नवीनच नाद लागला आहे."

कांहीं तरी अश्रुतपूर्व व भयंकर गोष्ट ऐकण्यास त्या सज्ज झाल्या आहेत असें मामींच्या घट्ट मिटलेल्या ओंठावरून वाटलें.

काकू पुढें म्हणाल्या, ( एकादी विलक्षण गोष्ट सांगण्याची पूर्व-

तयारी म्हणून त्यांनीं केस मागें सारले व एकदां नाक शिंकरून व घसा साफ करून पदरानें तोंड पुसलें. तेवढ्या अवधींत मामींनीं पुन्हा घागरीची उचलबांगडी केली. ) काकू म्हणतात, " दादासाहेब कसल्या तऱ्हेचा माणूस आहे, हें तुम्हांला ठाऊकच आहे ? "

मामींनीं आपल्या मुद्रेवरून असें दर्शविलें कीं पृथ्वीच्या अजून न शोधलेल्या भागांतील अत्यंत रानटी जातींच्या कोटींतील ते आहेत, हें आपण पूर्णपणें जाणून आहों.

" सोन्यासारख्या बायकोला टाकलीन् आणि बहिणीला जवळ घेऊन राहिला आहे. बरं ती कपाळकरंटी ! मला नाहीं वाटत, मामी, ती त्याची बहीण असेलसं ! "

आजपर्यंत जरी मामींना स्वतः असा कधीं संशय आला नाहीं तरी खात्री असल्यासारख्या त्या म्हणाल्या, " मागंच मीं ताडलं आहे तें. बरं मग ? "

" खरंच पण तोंड असून बोलवत नाहीं. तर त्या सुशिलेकडे म्हणून ही आतांशा जाऊं लागली आहे. "

कांहीं तरी विस्मयकारक गोष्ट ऐकण्याकरतां म्हणून मामींनीं जे घट्ट ओंठ मिटले होते ते निराश होऊन अमळ ढिले झाले. व यांत चमत्कार तो काय हें न समजून त्या डोळे मिचकावीत राहिल्या.

" ध्यानांत घ्या माझं बोलणं नीट मामी. ऐकलंत का, तिथें सुशिलेचें निमित्त करून ती दादासाहेबांशीं हंसत-खिदळत असते ! "

आतां मात्र वाटलें होतें त्यापेक्षां जास्त आश्चर्य मामींना वाटलें.

" परमेश्वरा ! " त्या लुल्या होऊन ओरडल्या. आपल्या पतीची निधनवार्ता त्यांनीं जास्त निर्धारानें ऐकली असती ! इतक्यांत त्यांची

घागर घसरली. ती सांवरीत त्या म्हणाल्या, " खरंच का ? कशावरून म्हणतां तुम्ही ? "

" कशावरून ? पुरावा आहे. प्रत्यक्ष पुरावा. "

चित्तवृत्ति उचंबळून टाकणारा हा पुरावा ऐकतांना पुन्हा घागर गळून पडेल या धास्तीनें त्यांनीं ती घट्ट धरली.

" बाळीला आला होता फणफणून ताप. म्हणून गण्याला म्हटलं, असतील तसे डाक्तरना घेऊन ये. पण अर्धी घटका झाली, तेव्हां गण्याला फिरून म्हटलं, ' गाढवा, जा, त्यांना ओढून घेऊन ये. करताहेत तरी काय ? ' तेव्हां त्यानं सांगितलं, कीं गोपाळरावांची बायको पेटी वाजवीत बसली आहे अन् ते तिला अगदीं खेटून बसले आहेत ! अगबाई ! म्हटलं. इथं पाणी मुरतं आहे. "

" पण सुशीलाताई नव्हत्या का घरीं ? "

" असल्या तरी काय ? एकाच माळेचे मणी. पण मी विचारायला विसरलें नाहीं. 'दुसरं कोणी नव्हतं' म्हणाला ना गण्या. पुन्हा गण्या गेला तों डाक्तरसाहेब गाताहेत आणि हिनं पेटीवर सांथ धरली आहे. मारे चहा ढोसताहेत ! मजा चालली होती—"

" एक एक ऐकावं तो चमत्कारच ! काकू "—काकूंना आपल्या कटांत घेऊन मामी म्हणतात, " काकू, ती पूर्वी नाटकांत होती म्हणतात, तेंच खरं दिसतं ! "

" दिसायला अजून शिंगंच का आहेत ? काय सांगूं तुम्हांला, खरं सुद्धां वाटायचं नाहीं. अहो, ही पूर्वीं नाटकांत होती. तिथं भांडली. ते एक नानासाहेब म्हणून दुसरे एक पार्टी आहेत. ते तडजोड करायला आतां इथं येणार आहेत. सगळी बातमी काढून

आहें मी! हिला नाहीं आपल्या आईबापांचं नांव माहीत! नाहीं कूळ ना धर्म! कशी गोपाळरावांना आवडली! माझी बाळी—कसा यांचा विठोबा रखमाबाई सारखा जोडा शोभला असता."

चिंगीचें नांव मामींच्या जिभेवर आलें होतें पण तसेंच तें त्यांनीं गिळलें.

इतक्यांत त्यांना जानकीबाई भेटल्या. त्यांच्या येवढ्या अवधींत तीन खेपा झाल्या होत्या. "कां मामी, आज कांहीं स्वयंपाकपाणी आहे का नाहीं?" त्या म्हणाल्या.

दोघीही जाग्या झाल्या. "आज आदितवार आहे" मामी म्हणाल्या.

"तुका म्हणे उगी रहावें अन् जें जें दिसेल तें पहावें!" मामी घागर बदलीत म्हणाल्या. काकूंनींही एक दीर्घ श्वास सोडला व एकदां कमर चेपल्यासारखें करून त्यांनीं पदर कसला व 'अगबाई' करीत घागर उचलली.

"थांबा, मी पण आलेंच येवढी घागर भरून." मामी म्हणाल्या. व त्या परत येईपर्यंत ही सर्व कहाणी आणखी थोडें तिखट मीठ लावून काकूंनीं जानकीबाईंना निवेदन केली. नंतर आपापलीं मतें देत त्या तिघी परत निघाल्या.

* * * *

'बाईसाहेबांनीं' जाणूनबुजून केलेला उपमर्द व त्यांचीं कुजकीं-नासकीं भाषणें रमा विसरली होती. तिनें जरी तसें बोलून दाखविलें नाहीं तरी तिच्या मनाला तें लागून राहिलें होतें. पण एकीकडून त्यांत पहिल्यानें आपलीच चूक झाली, असें तिला आतां वाटूं लागलें. बाई-साहेबांकडे जाताना निदान बूट तरी घालायचे नव्हते असें तिला

मनापासून वाटलें. विशेष कारण नसतां बाईसाहेबांचा हा आपणच अपमान केला—व तोही जाणून-बुजून, हें लक्षांत येऊन तिला पश्चात्ताप होऊं लागला. बाईसाहेब कांहीं आपला मान मोठा आहे असें म्हणाल्या नव्हत्या. बरें, गोपाळरावांनीं शिष्टाचार कसा तो सांगितला. बाईसाहेबांच्या स्वभावाबद्दल तिला कांहींच कल्पना नव्हती. असें असतां तिनें आपल्याच पतीचा सूड घेण्याकरतां बाईसाहेबांवर आग पाखडली असा या साऱ्या प्रकरणाचा अर्थ होत होता. शिवाय असें केल्यामुळें आपल्या पतीवर एक प्रकारें लांछनच आलें होतें—व तें आपल्या अविचारीपणामुळें हें तिला उमजलें. अखेर एकदां पतीला ती म्हणाली, " माझ्या हातून एक चूक झाली. "

" कोणची बरं ? " लडिवाळपणानें गोपाळरावांनीं विचारलें.

स्पष्ट आणि निर्भीडपणें तिनें म्हटलें, " मी बाईसाहेबांकडे भेटायला गेलें त्या पोशाकांत जायचं नव्हतं. " या वेळीं तिनें बाईसाहेब या शब्दावर जोर दिला नाहीं.

" पण तें झालं गेलं. आतां काय त्याचं. आतां बूट ठेवून दिलेस ना ? खरंच, आज मीं एका लुगडेवाल्याला बोलावलं आहे. तुला दोन लुगडीं घ्यायचीं आहेत ना ? मग पसंत करून दोन ठेवून घे. "

रमेचें दुःख विसरून जाऊन तिला अत्यंत आनंद झाला. आतां एक सुंदरसें फॅशनेबल लुगडें घेण्याचें तिनें मनांत ठरविलें.

ठरल्याप्रमाणें लुगडीवाला आला. धारवाडी, इर्कली, महेश्वरी त्यानें अत्यंत भारी किमतीचीं लुगडीं काढलीं. पण त्यांतील एकही रमेच्या मनांत उतरेना. तिच्या मनांत गंगाजमनी अरुंद काठाचें लुगडें व एक रंगी-बेरंगी बनारसी पातळ घ्यावयाचें होतें. पण त्याजवळ ह्या

तऱ्हेचें एकही नव्हतें. लुगडेवाला एकाद्या लुगड्याची घडी उचकटून "पहा—असा माल मुंबईस मिळायचा नाहीं. सगळं रेशीम भरलं आहे. असा रुंद कांठ अन् असा भरलेला पदर—" वगैरे आपल्या मालाची जों जों शिफारस करी तसतशा रमेच्या कपाळाला आंठ्या पडत व ती नाक मुरडी. "मुंबईच्या चालीचं नाहीं का एकादं पातळ ?" ती म्हणाली. "फारशीं नाहींत—पण हवीं तर आत्तां घेऊन येतों दाखवायला. मला तसं सांगितलं असतं तर तसं घेऊन आलों असतों. पण रावसाहेबांनीं मला तीनदां बजावून सांगितलं कीं चांगलीं उंची उंची, जुन्या चालीचीं घेऊन जा! जारे सख्या—जा तुक्याला सांग कीं तीं कोइंबतुरी—मुंबईचीं—चौकटीचीं—त्या पातळांचं गांठोडं घेऊन ये."

कांहीं वेळानें रमेनें आपल्या पसंतीचें एक फॅशनेबल पातळ व लुगडें ठेवून घेतलें.

रात्रीं गोपाळरावांनीं म्हटलें, "आला होता का किसनदास ?"

"हो! सांगितल्याप्रमाणं दोन ठेवून घेतलीं आहेत." असें म्हणत तिनें कपाटांतून सुंदरशा पातळ कागदांत गुंडाळलेलीं लुगडीं आणलीं. तो सुंदर कागद पाहतांच संशयाचा एक ढग गोपाळरावांच्या चर्येवरून गेला. उल्हसित मुद्रेनें तिनें कागद सोडून घडी उघडून लुगडें दाखविलें. तें गंगाजमनी कांठाचें लव्हेंडर रंगाचें लुगडें होतें.

खर्रकन गोपाळरावांचा चेहरा उतरला. रमेला वाटलें होतें आपल्या निवडीची ते तारीफ करतील. पण भाजीवालीनें तारीफ केलेल्या बिलबिलित पेरूंना ज्या मुद्रेनें आपण हात लावतों तशा तऱ्हेनें गोपाळरावांनीं त्या लुगडयाचा कांठ आपल्या चिमटींत धरला,

( कारण तो इतका अरुंद होता ) व अलगद उचलला ( कारण तें लुगडें इतकें नाजुक होतें. ) " हें काय घेतलंस तूं हें ! " ते नापसंतीनें म्हणाले.

" कां ? वाईट का आहे ? " साशंक मुद्रेनें रमेनें विचारलें.

गोपाळरावांनीं जास्त न पाहतां होतें तसें त्या कागदांत बांधून ठेवलें. " बरं हें पाहूं ? " याहीपेक्षां कुजके पेरू फळवाली दाखवणार असें दर्शविणाऱ्या डोळ्यांनीं गोपाळराव पाहूं लागले. रमेचा धीर खचत चालला होता. लुगडयापेक्षां पातळच तिला जास्त आवडलें होतें. पण लुगडें जर पतीला इतकें नावडलें तर पातळाकडे ते ढुंकूनही पाहणार नाहींत अशी तिला भीति वाटली. पति नाखूष दिसले कीं तिचा जीव थोडा वरखालीं होई. तेव्हां बऱ्याच मनोनिग्रहानें ती म्हणाली, " हें कांहीं मी घेणार नाहीं—पण उगीच ठेवून घेतलं—दाखवायला. " हें सपशेल खोटं भाषण करतांना तिचा कंठ दाटून आला. व तें उलगडून दाखवायला ती कचरूं लागली. तें रंगीबेरंगी पातळ पाहून गोपाळरावांची छातीच दडपून गेली. तें पातळ म्हणजे कोणी हिंस्र प्राणी आहे अशा भावनेनें तें नीट पाहण्याकरतां त्यांचें डोकें पुढें वांकलें होतें, तें नजरेस पडतांच एकदम मागें दचकलें ! तिच्या मनांतील हेतु जाणण्याइतके गोपाळराव चाणाक्ष होते. आपल्याकरतां तिला स्वार्थत्याग करावा लागतो आहे व तो ती आपखुषीनें करीत आहे हें पाहून त्यांना जितकें समाधान तितकेंच कौतुक वाटलें. त्या पातळाकडे ते स्तिमित नेत्रांनीं पहात होते. जणुं कांहीं त्या पातळा-पलीकडे लिहिलेलीं भावीं अरिष्टें व त्या पातळाला चिकटलेलीं पिशाच्चें त्या पारदर्शक विणीमधून त्यांना स्पष्ट दिसत होतीं. एकदम त्यांनीं रमेकडे पाहिलें तों तिचे डोळे पाण्यानें भरून आले होते.

" नंतर हासण्याचा अविर्भाव आणून ते म्हणाले, " हें मुंबईस गेल्यावर नेसण्याकरतां वाटतं. " गोपाळरावांचें मन रमेच्या अश्रूंनीं विरघळूं लागलें होतें व म्हणून ही मधली तोड त्यांनीं काढली.

पण रमा निश्चयी होती. बाईसाहेबांकडे जातांना जो तोरा तिला आला होता त्यानेंच आतां पुन्हा उचल खाल्ली. दारूची बाटली कपाटांत ठेवली तरी केव्हां तरी काढावीशी वाटेलच अशा अर्थाचा रोख तिच्या मनांत होता.

" कशाला ? मला कांहीं घ्यायचं नव्हतं पण आपला एक नमुना म्हणून ठेवून घेतला होता दाखवायला. " तिचा आवाज खण-खणीत होता.

" उद्यां पाठवूं पुन्हा किसनदासाला ? " विचारण्याऐवजीं हुकूमच शोभला असता अशा आवाजांत ते म्हणाले.

रमा कांहींच बोलली नाहीं. एकादें मेलेलें मूल जसें झांकावें तसें तें पातळ तिनें त्या पातळ कागदांत गुंडाळलें. व दोन्हीं लुगडीं तिनें कपाटांत ठेवलीं.

नंतर ती पहिल्यानेंच भेटली आहे अशा स्वरानें ते म्हणाले, " कां, कसं काय आवडतं हें गांव ? "

रमा म्हणाली, " आपलं म्हटलं म्हणजे आवडून घेतलं पाहिजे. गांवाला काय ? हवा छान आहे, पाणी सुरेख आहे. घरही वाईट नाहीं. पण गांव म्हणजे कांहीं घर आणि भिंती नव्हे. गांवांतलीं माणसं बरींवाईट असतील त्या मानानं गांवाची किंमत करायची. "

" मग तुम्हीं या गांवकऱ्यांची काय पारख केली आहेत ? तुझ्या स्वरावरून तरी ती फारशी प्रिय आहे असें दिसत नाहीं ! "

" मी कुठेंसं वाचलं आहे–" आपल्या ज्ञानाचा उपयोग करण्याची संधि आलेली पाहून तिला अभिमान वाटला–" वाचलं आहे कीं राष्ट्राचा मोठेपणा त्याच्या द्रव्यराशीवर अगर मौल्यवान् खाणीवर जंगी इमारतींवर तसेंच सुंदर खाण्याच्या पदार्थांवर अवलंबून नसून तेथील रहिवाशांच्या शीलावर आहे. तीच गोष्ट कमी प्रमाणांत या गांवालाही लागूं अहे."

पत्नीच्या या वाक्चातुर्यानें संतुष्ट होऊन पतिराज म्हणाले, " एकूण तुझं कांहीं अनुकूल मत दिसत नाहीं."

" इतक्यांतच कसं सांगूं ? म्हटलं आहे ना ? ' समूळ ग्रंथ वाचल्यावीण—' पण प्रस्तावना कांहीं उत्तेजक नाहीं, येवढं खरं."

" तर मग तुला पश्चात्ताप होत असेल ?"

" कसला ?"

गोपाळरावांनीं डोळे मिचकावून स्पष्टीकरण केलें.

तें ओळखून रमा ओशाळली. " इश्श !" ती जवळ जाऊन म्हणाली, " अशी स्वप्नांत सुद्धां कल्पना आणूं नका. जें गांवाचं तेंच व्यक्तीविषयीं खरं आहे. मनुष्याचा चांगुलपणा पोषाकावर अगर मतावर थोडकाच आहे ?"

तिचा हात आपल्या हातांत घेऊन व तो गोंजारून गोपाळराव म्हणाले, " मी तुला आवडतों का ?"

" तसं नसतं तर मीं—अक्कांनीं विचारलं तेव्हां होच म्हटलं नसतं."

पुन्हा खात्री करून घेण्याकरतां व थोडें थट्टेनें ते म्हणतात, " कां ' पदरीं पडलें, पवित्र झालें !' "

" पवित्र होण्यापूर्वींच पदरीं पडण्याइतका अविचार करण्याकरतां कां इतकं शिकायचं ? " ती लागलीच म्हणाली.

" नाहीं,–रमे " गद्गद स्वरानें पतिराजांनीं म्हटलें, " मीच पवित्र झालों. आजच्यासारखं सुंदर संभाषणाचं सौख्य मला अननुभूतपूर्व आहे. " त्यांच्यानें पुढें बोलवेना पण हात रिकामे असल्यामुळें त्यांनीं तिला आणखी जवळ घेतलें. पण खेटून बसण्यांतच प्रेमाचं सार आहे अशी तिची कल्पना नसल्यामुळें ती होती तेथेंच उभी राहिली, " हें काय ? " ती त्रासून म्हणाली.

" कां ? माझ्या हातांना कांटे आहेत काय ? "

रमा लाजली. नंतर धिटाईनें त्यांच्या तोंडाकडे तोंड करून म्हणाली, " हं, काय ? "

" दुसरं काय ? " असें म्हणून ते समयोचित वागले.

" अशा रीतीनें नेहमीं नेहमीं प्रेमाचा अंत करणं मला नाहीं आवडत ! "

" याला तूं प्रेमाचा अंत म्हणतेस ? "

" नाहीं तर काय ? हृदयांतील प्रेमाला ओंठावाटे असं काढून लावलं तर तें आटणार नाहीं का ? "

" वेडे, याला प्रेमाची देवघेव म्हणतात. हृदय हा प्रेमाचा अक्षय भाता आहे. "

" पण अगोदरच लाजेनं भेलेल्या हरिणीला पुन्हा बाण मारण्यांत काय पुरुषार्थ आहे ? "

तिचें भाषण ऐकण्यापेक्षां तिचा खणखणीत स्वरच त्यांच्या कानांत घुमत होता, व तिच्या उंच यष्टीकडे ते टक लावून पहात होते.

" तसं नव्हे " ते म्हणाले, " मनुष्य उच्छृंखल व चलाख प्राणी आहे. जीभ स्वस्थ बसली म्हणजे ओंठ अस्थिर होतात. "

" त्यांना गप्प करायला दांतांनीं चावावेत. " ती म्हणाली.

" वा ! आपल्याच दांतांनीं ओंठाला चाववेल ? "

" तर मग आपल्याच दांतांनीं आपल्याच ओंठाला कसं चाववतं बाई ! "

" रमे, कोट्या करायला कधीं शिकलीस ? "

" तुम्हीं सुचविलंत तेव्हां मीं म्हटलं. त्यांत माझं कसलं कौतिक ? पतीचे शब्दच पत्नीनें उच्चारले. "

" हो पण त्यांत चावा होताच. " हसत हसत ते म्हणाले.

" झालं तर मग. यानं माझ्याच सिद्धांताला मदत होते. शब्दहि तेच आणि अर्थ एकच.मग ती कोटी करण्यांत माझी कसली शिफारस ?"

" जाऊं द्या ना. अशा तऱ्हेनें भांडण्यांत काय अर्थ आहे ? आपलेच दांत आणि आपलेच ओंठ ! " ती किंचित् स्वतःशींच बोलली.

" पण त्यांतच खरं सौख्य आहे. आणि असा प्रसंग यावा— म्हणूनच वत्सले, मीं तुझ्याशीं लग्न केलं."

' वत्सला ' हें माहेरचें नांव ऐकून रमेला पूर्वीच्या आठवणी झाल्या. ' बाईसाहेबांनीं ' खुर्ची रुमाल आणि साबण मागविला होता ती गोष्ट ती विसरली. पतीनें बूट गाठोड्यांत बांधून ठेवायला सांगितलेलें ती विसरली. पातळ आणि लुगड्याचें स्वप्न ती विसरली. रोज पाकीट आणि छत्री घेऊन गर्दीतून धांपा टाकीत जाण्याची तिला आठवण झाली. बीजगणिताच्या रकमा तिला फळ्यावर दिसूं लागल्या. व त्या मानानें या घटकेला स्वर्गसुख अनुभवित आहों असें तिला वाटलें.

इतक्यांत तिला नानासाहेबांची आणि बाजाच्या पेटीची आठवण झाली. झोंपेंतून जागी झाल्यासारखी होऊन ती म्हणाली, " खरंच, केव्हां एकदां नानासाहेब येतील असं मला झालं आहे. "

गोपाळरावांच्या मनांतील सुखद विचारांना नानासाहेबांनीं धप्प-दिशीं खो दिला. अशा आरामाच्या वेळीं खेळांतील गड्यांच्या मागें लागून रिंगण घेण्याची त्यांची मर्जी नव्हती. कशी तरी एक फेरी घेऊन पुन्हा नानासाहेबांनाच खो देऊन स्वस्थ बसण्याचें त्यांनीं ठर-विलें. या उद्देशानें ते म्हणाले, " पेटीकरतां ना ? आजच्यासारखा वेळ मजेंत जाऊं लागला तर पेटीची काय येवढी प्रतिष्ठा ? खरंच, सालंकार संभाषणांत जशी गोडी आहे तशी कशांत नाहीं. "

पण पेटीची गोष्ट रमा विसरली नाहीं. पतीच्याच भाषणाचा धागा धरून ती म्हणाली, " होय, पण सालंकार असून संगीतही असेल तर दुधांत साखरच पडली म्हणावयाची—माझंसुद्धां असंच आहे. माझी जीभ स्वस्थ बसली व डोळे वाचीनातसे झाले म्हणजे हात फुरफुरूं लागतात. व पेटीचा मंजुळ ध्वनि घुमूं लागला म्हणजे जिभेला अवसान चढतें व ती गाऊं लागते. इकडचे ओंठ व जीभ थकली आणि हातही गप्प बसले म्हणजे कानांना खाद्य हवंच ना ? तें मीं आपल्या ओबड-धोबड वादनानं व अल्पशा गाण्यानं खाऊं घालीन. "

'तिकडचे' कान भुकेले होते खरे, पण असं 'वेडंवाकडं' कांहीं खाऊं नका असें त्या गांवचे वैद्य आणि वैद्यिणी कुजबुजत होत्या. त्या गांवच्या हवेला तें मानवत नसे.

या प्रेमळ संवादानंतर रमेच्या अंगीं एक नवीनच चेतन आलें व मूठभर मांस चढल्यासारखें तिला झालें, व ती विकसित चित्तानें झोंपीं गेली. गोपाळरावांचा चेहरा ती निजल्यावर प्रफुल्ल दिसूं लागला व तिच्या निद्रिस्त तोंडाकडे ते उल्हसित मनानें पाहूं लागले. कांहीं वेळानें त्यांनाही सुखशय्या लाभली.

* * *

आपल्या गांवीं आलेल्या या नव्या आक्काबाईच्या स्वैर वर्तनाला आळा कसा घालावा, या चिंतेची, काकूंच्या लागोपाठच्या पांच मुलींच्या काळजींत भर पडली. कित्येक दिवस आडून गोळ्या मारण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. बाळीच्या जन्माचें नुकसान करून दीड-दोन शेर रवा व तितक्याच रुपयाचें तूप विनाकारण खर्ची पाडण्यास हीच अवदसा कारण झाली होती. 'या गांवांतून तिला हांकून लावीन तरच नांवाची सत्यभामा!' असा त्यांनीं मनांत विडा उचलला. रमेविषयीं नानातऱ्हेच्या नसत्या कंड्यारूपी बेणबाजा वाजवून त्या सैन्य गोळा करीत होत्या. बाईसाहेबांच्या पडवींत एक, मामींच्या ओटीवर दुसरा, जानकीबाईच्या गोणी पाठीमागें तिसरा, नदीच्या घाटावर, पिंपळाच्या पारावर, असें त्यांनीं मोर्चे बांधून तयार ठेवले होते.

कांहीं सरकारी कामाकरितां गोपाळराव चीफसाहेबांच्या घरीं गेले होते. पण चीफसाहेब घरीं नाहींत असें त्यांना कळलें. बाहेर अंगणांत गोपाळरावांचा आवाज ऐकून सहज म्हणून काकू बाहेर आल्या व 'अचानक' गोपाळरावांना पाहून म्हणाल्या, "कां तात्यासाहेब, आज इकडे यायला कसं फावलं? जा ग, घरांत पुरुष आहेत का पाहून ये. बसा तात्यासाहेब."

" नाहीं—ते बाहेर गेलेत असं आतांच कळलं. बरं, भेटतील, कचेरी–बिचेरींत." असें म्हणून ते जाऊं लागले.

" घरांत नसायचं म्हणून अगदीं त्याच पावलीं का परतलं पाहिजे ? " काकू म्हणाल्या. ही संधि मारा करण्यास बरी आहे, असें त्यांना वाटलें.

पण गोपाळरावांना काम असल्यामुळें त्यांना जायला पाहिजे होतें.

" आतां कशाला बाई तुम्हांला वेळ होतो आहे !—गरीबांच्या घरीं बसायला. नवी विटी नवा डाव—" बाळी आसपास नाहीं अशी खात्री करून घेऊन त्या म्हणाल्या.

आपल्यावर बायकोचा पगडा नाहीं हें दर्शविण्याकरितां गोपाळरावांना बसावें लागलें.

काकू पुढें म्हणाल्या, " म्हणून कांहीं पूर्वीच्या ओळखी विसराव्या असें नाहीं ! आम्ही बाई खेडवळ माणसं. आम्हांला कुठं छत्र्या नि जोडे तरी माहीत आहेत ? " प्रत्यक्षच मारा त्यांनीं सुरू केला.

गोपाळरावांनीं ओळखलें कीं रंग निराळा आहे व बसल्या जागीं ते हालचाल करूं लागले.

त्यांना डांबवून ठेवून गोष्ट काढली पाहिजे असे काकूंनीं ताडलें व त्या स्वतःच थोडें कांद्याचें थालीपीठ केलें होतें तें एका ताटलींत घेऊन आल्या. ( बाळीला कांहीं तरी काम सांगून त्यांनीं तिसऱ्या मजल्यावर अडकावून टाकलें. ) हें थालीपीठ देण्यांत त्यांचा एक किमान हेतुही होता. बाळीला करून घ्यावी म्हणूनच आपण गोपाळरावांचें आदरातिथ्य करीत होतों असा नीच विचार आपल्या मनांत नव्हता असें त्यांचें त्यांनाच व गोपाळरावांनाही दर्शवावयाचें होतें. या वेळीं

थालीपीठ जरी बाळीनें केलें होतें तरी त्या गोष्टीचा उल्लेख आज काकूंनीं केला नाहीं.

" बरं तात्यासाहेब, आम्हांला गाणं आणि पेटी कधीं ऐकवणार ?—"

" गाणं अन् पेटी ? मी गवई आहे कीं काय ? आणि पेटी आहे कुठं आमच्या येथें ! " ते मुद्दामच म्हणाले.

" वेड घेऊन पेडगांवाला नका जाऊं. डाक्तर तिच्या गाण्याची फारच तारीफ करीत होते. सुशीला सांगत होती कीं डाक्तर गाऊं लागले अन् रमाबाई पेटी वाजवूं लागल्या म्हणजे नागिणी डोलूं लागतात. "

रमा सुशीलेकडे जाते हें गोपाळरावांना माहीत होतें पण तेथें इतका प्रकार चालतो हें त्यांना माहीत नव्हतें.

" हो—ते एक नानासाहेब म्हणून ठाऊक आहेत का ? पूर्वी नाटकांत होते म्हणतात. ते आल्यावर तर बहारच होईल.—पण—मला कांहीं नसत्यांत तोंड घालण्याचं कारण नाहीं—आपल्याला काय करायचं आहे—पण तुम्ही मला मुलासारखे म्हणून बोलल्यावांचून राहवत नाहीं—तिची ही वागणुक कांहीं—मीच म्हणतें असं नाहीं—सारं गांव म्हणतं आहे.—"

बाळी अत्यवस्थ असती तर जसा चेहरा काकूंनीं केला असता तसाच त्यांनीं आतां तालुक्यांतील अव्वल कारकुनाची बायको बूट घालते आणि पेटी वाजवते म्हणून केला.

गोपाळराव भराभर थालीपीठ संपवूं लागले. ते खात नसते तर कांहीं तरी सबब काढून खाड्दिशीं चालते झाले असते.

पण त्यांना अडकविण्याचा काकूंचा पेंच फार नामी बसला होता.

अशा रीतीनें काकूंनीं आपलें मनोगत प्रकट करण्यास आरंभ केला.

आपल्या प्रिय पत्नीची अशी चहाडी ऐकून गोपाळरावांना राग आला. 'तिनें बूट घातले तर यांच्या पायाला तर लागत नाहींत ना ?' ते मनाशीं म्हणाले. पण ते स्वतः भिडस्त होते व काकू अमळ दुर्वासाचार्यांप्रमाणें समजल्या जात, म्हणून त्यांच्याशीं तोंड द्यायला गोपाळराव धजले नाहींत. तरी पण काकू म्हणतात तें खोटें नाहीं असेंही त्यांना वाटे. डाक्तर आणि त्यांची बहीण यांची ख्याति त्यांना माहीत होती.

* * *

नानासाहेब केव्हां येतात आणि आपली पेटी केव्हां येते असें रमेला झालें होतें. पुष्कळ दिवसांची तिची एकच मनीषा तृप्त होण्याचा समय जवळ आला होता तसतशी ती जास्तच आतुर होऊं लागली. दिवसभर तिला करमत नसे. कारण सारा दिवस व पुष्कळ वेळां रात्रींही गोपाळरावांना काम असे. "लवकर यायचं गडे" असें ती गोपाळराव जाऊं लागले म्हणजे बजावी व तेही, 'हो—अगदीं लवकर बरं,' असें आश्वासन देऊन जात. पण हल्लीं सारा जमा करण्याचें काम सुरू होतें. शिवाय, आज डेप्युटी कलेक्टरच आले, उद्यां शाळेचे दिपोटीच आले, परवां काय, सहकारी पतपेढ्यांबद्दल सभा आहे, अशा नाना प्रसंगांमुळें त्यांना रिकामपण मुळींच नसे. जेवण व स्नानसंध्या याला देखील क्वचित्‌च वेळ त्यांना सांपडे. यामुळें रमेला अगदीं एकटें एकटें वाटे व ती त्यांच्या वाटेकडे डोळे लावून मार्गप्रतीक्षा करी. एकाद वेळ असेंही होई कीं 'आतां अगदीं कांहीं काम नाहीं' असें त्यांनीं पत्नीला म्हणावें पण त्यांच्या संवादास आरंभ

होतो न होतो तोंच कोणीं " रावसाब हैती का ? " म्हणून पुकारावें अगर एकाद्या हवालदारानें अगर पाटलानें रिक्रूट घेऊन यावें. यामुळें रमेला करमत म्हणून नसे. कांहीं वीणकाम हातीं घ्यावें तर या खेड्यांत विणायची सुई देखील मिळायची नाहीं. तिचा अत्यंत आवडीचा विषय म्हणजे पेटी वाजविणें पण तेंही शक्य नव्हतें. गोपाळरावांशीं कोट्या करण्यांत अगर बुकांत, तिला आपलें डोकें, यामुळें नेहमीं घालावें लागे. तिचें डोकें इतक्या कोत्या मनाचें नसल्यामुळें अर्थात् तें अस्थिर होऊन गेलें. ती हळुहळू सुशीलेबरोबर व कधीं एकटीच नदीवर फिरावयास जाऊं लागली.

काकूंनीं गोपाळरावांची वडील माणसाच्या नात्यानें कानउघाडणी केल्यापासून त्यांनाही बरें वाटेनासें झालें. ते विचारमग्न व खिन्न दिसूं लागले. सुशीलेकडे वारंवार जाण्यांत व विशेषतः डाक्तरबरोबर बसण्यांत तिची घोडचूक होत आहे हें उघड दिसत होतें. साऱ्या गांवांत व जिल्ह्यांतही डाक्तरांबद्दल बोभाटा होता. व अशा माणसा-बरोबर आपल्यासारख्या घरंदाज माणसाच्या तरुण पत्नीनें जाणें अत्यंत गर्ह्य होतें, हें त्यांच्या लक्षांत आलें. पण याला आळा घालायचा कसा ? सुशीला आणि रमा मैत्रिणी. बरें, रमेची दुसरी कोठें गांवांत ओळख नाहीं. असली तरी सासरच्या दृष्टीनें. सुशीला ही जशी कांहीं माहेरच्या ओळखीपैकीं. तिच्या घरीं जाणें बंद करणें, हेंही निष्ठुर-पणाचेंच. पण या आचरटपणाला कठोर मनानेंच आळा घालण्याचें त्यांनीं ठरविलें. राजपुत्राकरतां आपल्या मुलाचा बळी देणाऱ्या प्रधानाप्रमाणें त्यांची चित्तवृत्ति झाली होती. एक दिवस त्यांनीं अत्यंत सावधगिरीनें, ममताळूपणें व निश्चयानें तो प्रश्न काढला.

" म्हणजे ? " ती आश्चर्यानें म्हणाली, " सुशीलेकडेही मीं जाऊं नये ? "

गोपाळरावांनीं नकारार्थीं मान हलवली. " समुद्रांत जाऊन कोरडं राहतां येईल का ? " ते म्हणाले.

" पण बोटींत बसून गेलं तर ?—सुशीलेची होडी करून ? " तिनें उत्तर दिलें.

" शिंतोडे उडणारच. " त्यांनीं शांतपणें म्हटलें.

गोपाळरावांचा चेहरा इतका विलक्षण गंभीर झाला कीं ही थट्टेसारखी दिसणारी गोष्ट केवळ थट्टा नव्हती हें स्पष्ट दिसत होतें.

" माझ्या बालपणींच्या मैत्रिणीकडे जायला चोरी ! आणि या साऱ्या गांवांत तेवढीच माझी मैत्रिण आहे. "

" कां बरं ? चीफसाहेबांच्या घरीं जात जा. मामीकडे बसायला जावं—"

रमा रागावून म्हणाली, " त्यापेक्षां एकाद्या वाघाच्या गुहेंत जायला कां सांगत नाहीं ! अथवा अस्वलीबरोबर थट्टाविनोद करण्याचा कां उपदेश करीत नाहीं. मी साफ सांगतें, त्या काकूंचा आणि तुमच्या त्या मामींचा—आणि या साऱ्या गांवाचा—मला तिट्कारा येतो. त्यांच्या कुजक्या-नासक्या बोलण्याची ओकारी आली आहे. येवढ्याकरतांच का—" तिच्या मनांत कांहीं म्हणायचं होतं पण तिनें जीभ चावली.

" कर—पुरें कर तें वाक्य. होय. माझीच—" कपाळावर हात देऊन ते सचिंत बसले. कांहीं वेळानें अत्यंत मृदु शब्दांत तिचे हात आपल्या हातांत घेऊन ते म्हणाले, " रमे—माझ्याकरतां तूं येवढा स्वार्थत्याग करशील का ? "

रमेचे डोळे पाण्यानें भरून आले. या गांवांतील एकच करमणूक—पण तीही नशिबीं नाहीं. ती कांहीं बोलली नाहीं. पण ऑपरेशनला तयार झालेल्या रोग्याप्रमाणें तिची मुद्रा झाली.

सहनशीलता, मनोनिग्रह वगैरे गुण वेताच्या काठीप्रमाणें आहेत. ती वांकवावी तितकी वांकते. पण त्याला तरी मर्यादा आहे. मर्यादेचा उंबरा ओलांडला कीं ती मोडते व एकीच्या दोन काठ्या होतात. पण प्रेम हें अस्सल पोलादी स्प्रिंगप्रमाणें आहे. ती किती ताणली तरी मोडत नाहीं. रबर ताणलें तर एका विशिष्ट ताणाला तें तुटेल पण प्रेमाची स्प्रिंग तुटत नाहीं—ढिली पडते. ती कामाला निरुपयोगी होते पण तिचें ऐक्य कायम असतें.

दुसरे दिवशीं रमा सुशिलेकडे गेली नाहीं. पण रडून रडून तिचे डोळे सुजले.

त्या साऱ्या घरांत ती भुतासारखी एकटी बसली होती.

नानासाहेब पेटी घेऊन येतील व 'मग तर चोरी नाहीं ? रात्रंदिवस मी पेटी वाजवीत बसेन.' ती स्वतःशींच म्हणाली. त्यावरून तिला मुंबईची—आपल्या माहेरची आठवण झाली. सायंकाळीं चौपाटीवरील सहल, फळ्यावर टांगलेला नकाशा, रंगीत वेण्या, समवयस्क मैत्रिणींबरोबर सिनेमा पाहणें—व तो काळ यापेक्षां किती तरी सुखाचा असें वाटून तिला रडें कोसळलें. आपल्यासारखी दुःखी आपणच अशी तिची खात्री झाली. दुःखातिरेक शांत मनानें गिळण्यांतच खरी सहनशीलता आहे असा भरंवसा येऊन तिनें स्वतःलाच खुष करण्याचा प्रयत्न केला पण व्यर्थ. तिची एक मैत्रीण "बॅरिस्टरीण" होती. दुसरी एका एडिटरची

पत्नी होती. तिसरी पुण्यास एका तरुण व सुधारक शाळामास्तरला दिली होती. ही नेहमीं म्हणत असे, "वत्सले, प्रेमाच्या तिवईवर लग्नाची घागर कधीं ठेवूं नको. चांगली भक्कम घडवंची पाहून घे." त्याचा खरा अर्थ आतां तिच्या मनांत बिंबला. तिवई दिसायला घडवंचीपेक्षां सुबक खरी पण जाणाऱ्या-येणाऱ्याचा फटकारा लागला कीं ती कलंडलीच. तिवई मोडायची नाहीं, पण कामाला निरुपयोगी. घडवंची जरी यदा-कदाचित् मोडली तरी घरच्याघरीं दुरुस्त होईल. तिच्या मैत्रिणीच्या या उपमा आणि उपमेयाची सार्थकता तिला पटत नसे व ही उपमा लग्नाच्या बाबतींत मुळींच लागू पडत नाहीं असें ती म्हणे. त्यावर मैत्रीण म्हणाली, "बरं, वत्सले, माझ्या या ओबड-धोबड घडवंचीची केव्हां तुला आठवण होईल, तेव्हां लिहून कळीव."

याप्रमाणें रडण्यांत व डोळे सुजवून घेण्यांत तिचे तीन दिवस गेले. तीन महिन्यांप्रमाणें ते तिला वाटले. या तीन दिवसांत ती पोक्त बाईसारखी दिसूं लागली. घडवंचीची उपमा लागूं न करण्याचा तिनें प्रयत्न केला पण व्यर्थ. लहान मुलींना येवढ्याचें येवढें वाटतें.

"एवढ्याकरतांच का मी इतकी शिकलें!" ती अखेर आपल्याशींच म्हणाली. "पुस्तकं लपवून ठेवण्याकरतां आणि सारा दिवस घरांत कोंडून घेण्याकरतां?"

पण सारखें दुःख अगर सारखें सुख कोणालाही नसतें.

* * *

"ताई—ताई! वत्सले," अशी हांक तिला ऐकूं आली.

त्या दुःखावेगांतही तिला ब्रह्मानंद झाला. सुशीला तिला ताई न म्हणतां वत्सला म्हणत असे. आज कितीतरी दिवसांत माहेरच्या

नांवानें तिला कोणीं हाक मारली नव्हती. ' मोटार ' म्हटली कीं ज्याप्रमाणें विलक्षण गति, भयंकर धुरळा आणि पाँ पाँ यांच्या धांदलीची कल्पना मनांत येते, तसेंच ' ताई ' हें आवडतें नांव ऐकून "माहेर—बाळपण—सौख्य" याचें गोड चित्र तिच्या मनःचक्षूपुढें खेळूं लागलें. घाईघाईनें तिनें डोळे पुसले; खरडून डोळे पुसले. पण यामुळें ते पूर्वीं फारच ओले झाले असले पाहिजेत असें पाहणाऱ्याला ओळखूं येई. ' माहेर ' म्हटलें कीं मर्यादा, शिष्टाचार याचा विधिनिषेध नसतो. पदर तसाच टाकून ती बाहेर येऊं लागली पण दारांतच नानासाहेबांना पाहून ती दचकली व तिनें पदर नीट केला. " नाना ! " ती म्हणाली.

" काय—ठीक ? " त्यांनीं विचारलें. उन्हांतून ते आल्यामुळें प्रथम तिचा अस्ताव्यस्त पदर अगर करपलेले डोळे त्यांना नीट दिसले नाहींत. तरी पण ' चिन्ह ठीक नाहीं ' असें त्यांना वाटलें.

" बसा नाना " ती म्हणाली,—कांहींच झालें नाहीं असा आव आणून ती म्हणाली. या प्रयत्नामुळें फारच कांहीं बिघडलें आहे असें तिचा चेहरा दर्शवूं लागला.

दगड टाकून पाहण्याकरतां व सहज अशा भावानें त्यांनीं विचारलें, " काय चाललं होतं ? "

" कांहीं नाहीं—बसलें होतें उगीच वाचीत. " तिनें टेबलाकडे पाहिलें पण दुर्दैवानें बूक वाचण्याचें अर्धेच टाकून ती नानांना भेटायला आल्याचा पुरावा दिसेना. " केव्हां आलांत तुम्ही ? "

" हा आत्तांच. डाक्तरांच्या येथें सामान ठेवलं, चहा घेतला अन् निघालों. "

नानांना वाटलें होतें ती आपल्याला पाहिल्याबरोबर ‘ पेटी कुठें आहे ’ म्हणून विचारील. निदान ‘ सामान ’ हा शब्द ऐकल्यावर तरी तिला पेटीची आठवण होईल.

ताईला येथें सुख लागत नाहीं हें त्यांनीं खात्रीनें ओळखलें.

“ ताई ! खरं सांग—तुला येथें सुख लागत नाहीं. ” क्षयरोगावर डाक्तर ज्याप्रमाणें गंभीरपणें मत देतो तसा नानांचा आवाज होता.

हसण्याचा आविर्भाव आणून ती म्हणाली, “बरं झालं सांगितलंत, नानासाहेब. नाहींतर स्वर्ग दोनच बोटें आहे अशा कल्पनेनें मी चढून गेलें असतें. ”

पण हें उसनें अवसान नानांनीं ओळखलें. पण ‘ स्वर्ग ’ याचा अर्थ जरा निराळा केला तर तें खरें होतें.

“ पेटी आणलीत का नाना ? पेटीच्या भात्यावर पाय दिले कीं स्वर्गाला हात पोहोंचलाच. ”

अगोदर ‘ नाहीं ’ असें थट्टेनें सांगण्याचा त्यांचा विचार होता. पण वत्सलेच्या खरेपणावर त्यांचा अजून विश्वास न बसल्यामुळें त्यांनीं म्हटलें, “ कशी बरं आणणार नाहीं. ”

पेटी बाहेरच पडवींत ठेवलेली होती.

लवकरच पेटीचा मधुर ध्वनि व नानासाहेबांचें गाणें बाहेर सुंदर ऐकूं येऊं लागलें. नानांचा आवाज गोड नव्हता—पण त्यांत रागदारी भरली होती. एकादें अवजड दार अगर चरक जसा घरघर वाजतो व मागोमाग ‘ऊंSSS’ असा बारीक ध्वनि येतो तसा नानांचा घोगरा आवाज व पेटीचा अनुवाद ऐकूं येऊं लागला.

दोन-तीन पदें झालीं. नानासाहेबांना कांहीं आठवलें व ते म्हणाले, " आज तीन दिवसांत तूं सुशीलेकडे गेली नाहींस ? डाक्तरही म्हणत होते. तेच आज चवकशीला येणार होते. आज चलतेस का ? "

वत्सलेची मुद्रा खिन्न झाली.

" तुला बरं नाहीं ? " त्यांनीं विचारलें. कांहीं तरी पाणी मुरत आहे अशी त्यांची खात्री झाली. " तें कांहीं नाहीं. खरं सांग, तूं सुखी आहेस का वत्सले ? "

" हो. पूर्ण. " ती शांतपणें म्हणाली पण तिच्या डोळ्यांत अश्रु उभे राहिले.

" गोपाळराव तुला चांगलं वागवतात का ? "

" अगदीं तळहातावरच्या फोडासारखी." न जाणून तिच्या स्वरांत एक प्रकारचें व्यंग आलें.

" मग आज येशील ? "

" नाहीं. "

" उद्यां ? "

" नाहीं. "

" केव्हां तरी ? "

" नाहीं, केव्हांही नाहीं. "

" कां बरं ? "

" तिकडे आवडत नाहीं. "

" आवडत नाहीं ? तें का ? "

" या गांवच्या लोकांना आवडत नाहीं. "

" मला तर हे गांवचे लोक वेडे आणि—मला गोपाळराव इतके

हे असतील असं वाटलं नव्हतं. विनाकारण अशी बंदी करणं म्हणजे एककल्लीपणाच."

"नाना, माझ्यापुढं अशी पतीची निर्भर्त्सना करूं नका. असतील कांहीं कारणं. सगळ्याच गोष्टी एका मनुष्याला समजून देणं देवाला आवडत नाहीं."

"वत्सले!"

"नाहीं. तिकडचं मन दुखविणं मला आवडत नाहीं. किती केलं तरी बायकांची अक्कल चुलीपुरतीच. निदान पत्नीपेक्षां पतीला ज्यास्त कळत असतं. आई आणि लेकीचा जरी मतभेद असला तरी लेकीला आईचंच ऐकलं पाहिजे." ती काय बोलत होती, तें तिचें तिलाच समजत नव्हतें. अभिमानानें पतीचा कड घेण्याचा ती यत्न करीत होती. पण न जाणून एक प्रकारचें व्यंगही त्यांत आलें. एकीकडून पतीबद्दल असमाधान व दुसरीकडून त्या पतीला सावरण्याचा प्रयत्न असा विलक्षण घोटाळा तिच्या मनांत झाला होता. अखेर मेंदूवर मुळींच दाब न राहून तिला एक मोठा हुंदका आला व डोळ्यांतून अश्रूधारा सुरू होऊन ती ढळढळां रडूं लागली.

नानासाहेबांचें मन कळवळलें व योग्य शब्दांनीं त्यांनीं तिचें सांत्वन करण्याचा यत्न केला. आतां उलट प्रकार सुरू झाला. माहेरचा आसरा आहे असें पाहून तिनें पतीच्या कागाळ्या करण्यास आरंभ केला व नाना पतीला सांवरूं लागले.

मामलेदारीणबाईंनीं खुर्ची दिलेली तिनें सांगितली. बूट गाठोड्यांत बांधून ठेवल्याचें सांगितलें व पातळांची शोकपर्यवसायी गोष्ट निवेदन केली.

तिला स्फुंदत ठेवून परतणें नानासाहेबांच्या जिवावर आलें. 'परत गेल्यावर आक्कांना काय सांगूं !' अशी काळजी त्यांना पडली.

* * *

अनभ्यस्त मनुष्य भरलेल्या बंदुकीकडे ज्या संशयित मुद्रेनें पाहतो तशा मुद्रेनें गोपाळरावांनीं हार्मोनियमकडे पाहिलें. पोटभर रडल्या-मुळें रमेचा दुःखभार हलका झाला होता. रात्रीं जेवण झाल्यावर गोपाळरावांनीं आपण होऊनच रमेला पेटी काढावयास सांगितली. आजपर्यंत वाजविली नव्हती इतकें कौशल्य आज तिनें दाखविलें. गोपाळरावांना संगीताची माहिती नव्हती पण कांहीं तरी अत्युत्तम वाजत आहे इतकें त्यांना वाटलें. रमेचा त्यांना अभिमान वाटला. "रमे" ते अत्यंत लडिवाळपणें म्हणाले, " तूं जादूची पेटी आहेस. "

दुसऱ्या दिवशीं अगदीं थकून गोपाळराव घराकडे परतले. लांबू-नच त्यांना असें दिसलें, कीं आपल्या घरापुढें बरीच गर्दी जमली आहे. आपापल्या कट्टयावर उभें राहून व बसून लोक कसली तरी वाट पहात आहेत. रस्त्यांतून जाणारीं येणारीं माणसें सुद्धां थांबल्या-सारखें करून व आपल्या घराच्या माडीकडे पाहून पुढें जात आहेत. पण गोपाळराव जवळ जवळ चालले तसतसें याचें कारण त्यांच्या ध्यानांत येऊं लागलें.

ते घरांत आले. पहातात तों डाक्तर, नानासाहेब सुशीला आणि रमा यांनीं पेटीभोंवतीं गराडा दिला आहे व गाणें बजावणें अगदीं रंगांत आलें आहे. त्यांना मनस्वी राग आला. डाक्तर वगैरेंचा हा अतिप्रसंग त्यांना पाहवेना.

गोपाळराव आंत आलेले कोणी पाहिलेच नाहींत. गोपाळरावांना वाटलें आपल्या घरीं ही चोरी होत नसून प्रत्यक्ष दरोडा आहे !

इतक्यांत डाक्तरांची नजर तिकडे गेली व ते म्हणाले, " ओहो ! तात्यासाहेब, बरे आलांत. तुमचीच उणीव होती. "

डाक्तरांचा हा उद्धटपणा पाहून काय करावें अगर काय बोलावें हेंच त्यांना समजेना. " हो—याला आळा घालायला ! "

गोपाळरावांनीं असा कांहीं विलक्षण गंभीर चेहरा केला होता कीं ही थट्टा नाहीं, हें सिद्ध होत होतें. डाक्तर वगैरे मंडळी चपापली. व हळुहळु सबबी काढून ते सर्वजण तेथून पळाले.

रमा एकटीच राहिल्यावर त्यांनीं तिला नांवानें हाक मारून म्हटलें, ' रमे, काय आरंभलं आहेस तूं हें ? " रमा डाक्तरांच्या घरीं जात . तेव्हां असाच प्रकार चालत असला पाहिजे असा विचार मनात येऊन त्यांच्या अंगाची लाहीलाही झाली.

आपल्या हातून असा कोणता गुन्हा झाला हेंच रमेला कळेना.

" रमे, त्या हार्मोनियमची किल्ली कुठें आहे ? "

ती पेटीलाच लावली होती.

" ती पेटी मिटव." त्यांनीं हुकूम केला. पण तो कांपरा आवाज होता.

" टाक कुलूप लावून." ते म्हणाले.

" इकडे दे किल्ली."

नंतर त्या मिटवलेल्या पेटीवर डोकें ठेवून रमा बसली—रडत बसली. गोपाळराव आपल्या खोलींत जाऊन हातावर डोकें ठेवून बसले. कॉलेज सोडून नोकरीवर जातेवेळीं त्यांच्या डोळ्यांत अश्रु उभे

राहिले होते तसे आतांही उभे राहिले. त्या दिवशीं रात्रीं गोपाळरावांनीं पाटावर बसून जेवणाचें सोंग केलें व हात धुतला. रमा कांहीं जेवली नाहीं, माजघरांतच ती निजली.

दुसऱ्या दिवशीं कोणी बोललें नाहीं. तिसऱ्या दिवशींही अबोलाच होता. पुढें दोन दिवस कामापुरतें बोलणें झालें. हे दिवस कसे गेले असतील ते वत्सलेचें वत्सलेलाच माहीत. पुढें होणाऱ्या वादळापूर्वीची ही शांतता होती.

एक दिवस रात्रीं कांहीं तरी निश्चय करून ती गोपाळराव दिवा लावून लिहीत बसले होते तेथें आली व म्हणाली, " मला एक विचारायचं आहे."

" काय ? " शांतपणें त्यांनीं विचारलें.

" हें आपण काय आरंभलं आहे ? "

" कां बरं ? "

" मला पेटीची किल्ली पाहिजे."

किल्ली टेबलावर पडलेली होती. पत्नीवर पूर्ण भरंवसा असल्यामुळें गोपाळरावांनीं आजपर्यंत ती तशीच पडूं दिली होती.

" रमे ! " ते आश्चर्यानें म्हणाले.

" काय ? "

" रमे ! " ते आवाज चढवून म्हणाले.

तिनें स्वस्थपणें म्हटलें, " मी ऐकतें आहें."

" पेटी वाजवण्याशिवाय दुसरं कोणतं काम बायकांना नसतं का ? देवधर्माकडे तूं कां दुर्लक्ष करतेस ? आज साऱ्या जिल्ह्यांत माझा हा बोभाटा पसरला आहे."

" पुढें."

तिच्या या शांत उद्धटपणामुळें नानासाहेब गोंधळले.

" एक दिवस तरी तूं देवळांत गेली आहेस का ? "

" बरं मग ? "

" मग काय. गाणं आणि पेटी वाजविणं हीच बायकांचीं दोन कर्तव्यें नाहींत."

" बूक वाचणं आणि बूट घालणं सुद्धां " तिनें त्यांना शुद्ध केलें.

" हो. तूं वरचेवर बाईसाहेबांकडे जात नाहींस अशीही कागाळी आहे. काकू-मामींशीं बोलत नाहींस. रीत-भात तुला ठाऊक नाहीं. बाईसाहेबांकडे जाणं तुला आवडत नाहीं खरं, पण गेलं तर त्या मारीत तर नाहींत ?—"

" प्रत्यक्ष लाटण्याचा उपयोग त्यांनीं अजून केला नाहीं—"

" पण तुझ्या अशा करण्यामुळेंच त्या किंवा कोणीही बोलतील. बरं, बोललं म्हणून अंगाला कांटे तर बोंचत नाहींत. "

" अंगाला बोंचते तर हरकत नाहीं, पण हृदयाला घरं पाडतात."

" आपलंच आपल्याला भोंवतं. तूं बूट घालून गेली नसतीस तर असं झालं नसतं. "

" हो—पण मला पेटीची किल्ली पाहिजे. "

" बरं देवधर्म करायला काय झालं ? त्यानं नुकसान तर होत नाहीं ना ? "

" नुकसान होत नसेल पण, पेटीची किल्ली मला हवी होती."

"रमे ! इतकंही अजून तुला कळूं नये ! साऱ्या जगांत ज्यांचा बोभाटा त्या लोकांबरोबर तूं हंसतेस खिदळतेस—तुमचीं गाणीं-बजा-

वर्णीं चालतात—रमे तुला माहीत नाहीं. काकू मला जें बोलल्या तें ऐकायला तूं असतीस तर असा हट्ट कधीं घेतला नसतास ! ‘ माझ्या घरीं नाटकं चालतात’ त्या म्हणाल्या. तुमच्या कंपनीला एक अचकट विचकट नांवही त्यांनीं दिलं आहे. ”

“ मी तें ऐकलं आहे. प्रत्यक्ष माझ्याशीं त्या बोलल्या नाहींत तरी या सर्व गोष्टी माझ्या कानावर जातील अशी व्यवस्था होत असते. ”

“ तूंच सांग—”

“ पण मला एकटीला वाजवायला कोणची हरकत आहे ? ”

“ प्रत्यक्ष नाहीं पण अप्रत्यक्ष आहे. तुझं मन अन्य कार्याकडं लागलं पाहिजे. देवाकडे लागलं पाहिजे. आलं ध्यानांत ? ”

“ ध्यानांत आलं—पण मी भक्तीचीं पदंच वाजवीन. ”

“ पेटी वाजविण्याशिवाय आणि पतीशीं वाद घेण्याशिवाय अन्य कर्तव्यें पत्नीला असतात. ”

“ आणि बायकोवर अम्मल चालवण्याखेरीज पतीची कांहीं कर्तव्यें आहेत. ”

“ रमे ! ”

“ मला किल्ली हवी आहे. ”

“ तुला—तुझ्याच बऱ्याकरतां—मी किल्ली देणार नाहीं. ”

त्या किल्लीकडे रमेनें निराशेनें पाहिलें व खळ्दिशीं आंसवें येऊन ती ओक्साबोक्शीं रडत माजघरांत गेली.

रात्रीं तिला ताप आला. सकाळीं ती बरीच आजारी होती. गोपाळरावांनीं डाक्तरना बोलावलें. त्यांनीं रोगाचें निदान बरोबर केलें. पण कांहीं तरी खोटेंच सांगून पाण्यांत रंग घालून औषध म्हणून

दिलें. डाक्तरांना घरीं आणतांना गोपाळरावांना कसेसेंच वाटलें. पण आजाराची हयगय नको असा विचार त्यांनीं केला. तीन रात्रीं जवळ जवळ जागून त्यांनीं काढल्या. रमा हिंडूं-फिरूं लागली. हा आजार 'देवाचा कोप' आहे असें तिला कळविण्याची काकूंनीं खबरदारी घेतली.

पुन्हा रमेनें म्हटलें, " ऐकलं का. मला पेटी उघडायची आहे."

" वेडे ! किती हटवादी तूं. पुन्हा हा प्रश्न काढूं नको."

" कां बरं ? पेटी माझी आहे " ( 'माझी' या शब्दावर जोर देऊन )—" माझ्या माहेरच्यांनीं दिलेली आहे आणि मला किल्ली पाहिजे."

गोपाळराव बुचकळ्यांत पडले. तिच्या हातांत किल्ली देऊन ते म्हणाले, " पण माझ्या घरांत पेटीचा आवाज घुमतां कामा नये."

आतां रमा गोंधळली. रागानें किल्ली आपटून ती म्हणाली, " येवढ्याकरतांच का--माझ्याशीं लग्न केलं ! " ती आपल्या खणखणीत स्वरांत म्हणाली ! " मला घरांत कोंडण्याकरतां—माझीं सुखं हिरावून नेण्याकरतां–मला छळण्याकरतां–" तिचा आवाज रडका येऊं लागला व गुडघ्यांत मान घालून ती स्फुंदूं लागली.

" बरं विचारलंस. रडूं नको, रमे ! ऐक, पहिली रमा अगदीं खेडवळ आणि अशिक्षित होती. तिचं डोकं कशांतच चालत नसे– गेलेल्या माणसाविषयीं वाईट बोलूं नये. पण तूं विचारितेस म्हणून सांगतों, मला ती मुळींच आवडत नसे. ती गेल्यावर अशा खेडवळ मुलीशीं लग्न न करण्याचा मीं निश्चय केला. मीं तुला पाहिलं—तुझे गुण पाहिले. तूं मला आवडलीस. तुझ्या अंगीं कल्पना चातुर्य आणि चलाखी आहे असें मी पाहिलें. पण ती चलाखी तें शहाणपण

भलत्या मार्गांत होतें. कौशल्य ठिणगी सारखं आहे. ठिणगी घरावर टाकली तर घर पेटतं, गवतावर टाकली तर शेकोटी करतां येते. तुझं शहाणपण अन्य कार्याकडे प्रयत्नानें लावतां येईल अशी मला आशा वाटली व अजूनही आहे. तुझ्याशीं संवाद करतांना जसा आनंद मला होतो—ब्रह्मानंद होतो—काय सांगूं! मी इथें नसून स्वर्गांत आहेसें वाटतें. मग सांग—माझी चूक आहे का ?"

हुंदके देतां देतां तिला जें ऐकूं आलें तें तिनें ऐकलें. तिला अलगद उचलून व तिचें सांत्वन करीत ते म्हणाले, "रडूं नको सांग—माझी चूक आहे का ?"

"मला नाहीं माहीत," स्वतःला सोडवीत ती म्हणाली.

"विचार करून सांग माझा हेतु किती सरळ होता."

पण गोपाळराव स्वतःशींच विचार करूं लागले तेव्हां त्यांना आपल्या कृतीच्या शहाणपणाबद्दल शंका वाटूं लागली. "मीं हिच्याशीं लग्न कां केलं ?" हा एकच विचार त्यांच्या मनांत उभा राहूं लागला. थोडा वेळ गेला अगर दोनचार वाक्यें ते बोलले कीं त्यांना प्रश्न पडे, "मीं हिच्याशीं लग्न कां केलं ?" ते काम संपवून निजावयास गेले तेव्हांही त्यांना तोच विचार डाचत होता. "असं होतं तर मीं हिच्याशीं लग्न कां केलं !"

* * *

वत्सलेला माहेरचें बोलावणें आलें. तिच्या मनांत जितकें जावयाचें होतें तितकेंच तिच्या नवऱ्याच्या मनांत तिला पाठवायचें होतें.— निदान त्यांनीं आढेवेढे मुळींच घेतले नाहींत. एक व्यवसाय कमी झाल्यामुळें काकूंना मात्र वाईट वाटलें.

आक्काला संशय येऊं नये म्हणून आगगाडींतच वत्सलेनें बूट चढविले, व आपलें झालरीचें पोलकें घातलें.

माहेरीं गेल्यावर तिला कांहीं दिवस सुखाचे गेले. सभा—सम्मेलनें, हार्मोनियम, फिरणें, गप्पागोष्टी इत्यादि व्यवसायामुळें वेळ केव्हां गेला हें तिला समजूं नये. काकूंना कांहीं संशय आला नाहीं. मनांत त्या समाधान मानीत होत्या. पण वत्सलेची प्रकृति पहिल्यासारखी नव्हती. पण केवळ मायेमुळें हा फरक आपल्याला वाटत असेल असें त्यांना वाटलें. त्यांनीं तिला अडून विचारलें, पण अत्यंत उल्हासानें व अभिमानानें तिनें आपण पूर्ण सुखी असल्याचें सांगितलें.

पण जसजसे दिवस जाऊं लागले तसतसे तिला कसेंसेंच वाटूं लागलें. कांहीं असलें तरी घरीं परतावें असें तिला वाटलें. गोपाळरावांना त्या खेडयांत एकटेंच टाकणें तिला बरोबर वाटलें नाहीं. व त्यांच्याकडे जायला ती आतुर झाली. त्या दोघांचें प्रेम होतें. आपल्याशिवाय त्यांची कोण काळजी घेणार ? त्या वेळीं बुटाच्या अगर झालरीच्या पोलक्याचा विचार तिला आला नाहीं. गोपाळरावांनीं आपल्या अंथरुणाशेजारीं तीन रात्रीं जागून काढलेल्या तिला आठवल्या. त्या रात्रीचा प्रेमसंवाद तिला आठवला. त्यानीं अलगद हातांनीं उचलून तिची समजूत करण्याचा यत्न केला होता. त्या दणगट पण अलगद हाताच्या स्पर्शाचा तिला भास झाला. ती परतली.

पण हाय ! ह्या वेळीं तिला मुंबई आणि या खेडुल्यांतील फरक ठळक दिसूं लागला. पहिल्या खेपेस नाविन्यामुळें तिला इतकें वाटलें नव्हतें. तें कोंदट दमट घर. ते घाणेरडे अरुंद रस्ते, पडकीं घरें, कुठें जाणें नाहीं, येणें नाहीं. जायचेंच आलें मनांत तर दुर्गंधि

येणाऱ्या बोळांतून, त्याहून अधिक कुजकीनासकी बोलणीं ऐकण्याकरतां एकापेक्षां एक वरचढ अशा अरसिक व खेडवळ बायाबापडयांकडे !

तिला मुळींच करमेना. गोपाळराव कधीं घरीं नसायचे. या खेपीं ती विणकामाचें सामान घेऊन आली होती. तिच्या मनांत सुशिला व आपण मिळून एक शिवणकामाचा व गाण्याचा क्लास काढावयाचा होता. तिची ती एक महत्त्वाकांक्षाच होती. एकदां हळूच तिनें तो विषय काढला. पण सुशिलेचें नांव ऐकतांच गोपाळरावांचा चेहरा फिका पडला. एकाद्या खुनी दरोडेखोराचें नांव ज्या भयभीत अंतः-करणानें आपण ऐकतों, तसेंच डाक्तर, नानासाहेब अगर सुशीला यांचें नांव निघतांच गोपाळरावांच्या अंगावर शहारे येत. झालें. आतां कोणताही मनोरंजक व्यवसाय तिला उरला नाहीं. कित्येक वेळीं पेटी उघडून वाजवावी—जें होईल तें होईल—असा तिला मोह पडे. हल-वायाच्या दुकानांतील रांगेनें मांडलेल्या बर्फीकडे ज्या आशायुक्त नजरेनें रस्त्यांतून जाणारें मूल पाहतें त्या दृष्टीनें रमा पेटीकडे पाही. त्या कोपऱ्यांत ती पेटी असून वाजवतां येत नाहीं. तिच्या आंत सुंदर स्वर आणि आलाप भरले होते पण पेटी उघडतां येत नव्हती. एकाद्या पुरून ठेवलेल्या द्रव्याच्या हंडयावर नाग जसा पहारा करतो तशी गोपाळरावांची नावड या पेटींत पुरून ठेवलेल्या मंजुळ नादावर पहारा करीत होती. आपल्या मनाला रंजविण्याचें, साऱ्या जगाला डोलवायला लावायचें सामर्थ्य त्या पेटींत होतें. पण हाय ! तोंड असून बोलतां येत नाहीं. हात असून वाजवतां येत नाहीं. यौवनानें रसरसलेल्या एकाद्या सुंदर विधवेप्रमाणें ती पेटी पाहणाऱ्याचें अंतःकरण पिळून काढीत होती,—तिचें यौवन, तिचें गोड भाषण सर्व वायां होतीं,

वाऱ्यावर टाकल्याप्रमाणें होतीं. रमेच्यानें तें पाहवेना. ती पतीला शेवटचें विचारावें म्हणून म्हणाली.

" मी एक सांगूं का ? "

" काय—पण नको. मला कांहीं ऐकण्याची इच्छा नाहीं— "

" पण—निदान ऐकून तर घ्याल ? "

" मी पुष्कळदां ऐकलं आहे. "

" मागून म्हणाल—"

" नको—नको—रमे, मला कांहीं विचारूं नको. माझं डोकं—मेंदु अधु झाला आहे. " टेबलावर हात ठेवून त्यावर डोकें टेकून ते म्हणाले.

" राहिलं, मीं आपल्याकडून करायचं तें केलं. मागून बोल लावूं नका म्हणजे झालें ! " असें म्हणत ती ताडताड पाय आपटीत व ओंठ चावीत निघून गेली.

गोपाळरावांनीं स्वतःलाच विचारलें, " मीं हिला कां करून घेतली ! देवा, चांगल्या मार्गाला चिकटून राहण्यांत माझं प्रेम आड येऊं देऊं नको ! "

रमाही मनांत म्हणाली, " तिकडे नावडणारी पण ज्यांत वाईट नाहीं अशी गोष्ट करतांना आमच्या प्रेमांत वितुष्ट न येवो ! "

* * * *

काकू गोपाळरावांना म्हणाल्या, " आपल्या बाईसाहेबांना भेटण्याची वेळ तरी मेली कोणती ? "

" म्हणजे ? मला वाटतं ती नेहमीं घरींच असते. "

" मग त्या कोंडून तरी घेत असल्या पाहिजेत—पण माझ्याबद्दल

इतका तिटकारा आहे असं मला कळतं तर बोलवायला तरी गेली नसतें! पण म्हटलं वर्षांतून एकदांच गौर मांडायची असते. ”

“ मी समजलों नाहीं.”

“—आमच्यां घाणेरडया घरीं कोण बाई येणार!–”

“ मग ती जाते तरी कुठें ? ”

“ म्हणजे ?—तुम्हांला नाहीं का माहीत ? इश्श! सगळंच.... ! मी समजत होतें, तुमच्या अपरोक्ष गोष्टी होत नसतील—जाऊं दे मेलं. नसत्या उठाठेवी आपल्याला काय करायच्या आहेत! पण ” (कळवळ्यानें) “ म्हणतात ना–आपला इतक्या दिवसांचा परिचय. पहिली होती तेव्हां– ” इत्यादि इत्यादि.

“ पण तुम्हांला हें सांगितलं कोणीं ? ” त्यांच्या बोलण्यावर भरंवसा न बसून ते म्हणाले.

“ अहो, चोरून गोष्टी केल्या तरी भिंती ऐकतात. इथं तर, दिवसा–ढवळ्या राजरोस–पण तुमच्या कानावर अजून ही गोष्ट जाऊं नये म्हणजे आश्चर्य आहे—” पुन्हा इत्यादि.

“ पण याला आधार आहे का ? ”

“ आधार ! भक्कम आधार आहे. पुरावा आहे पुरावा ! ” त्या ताठ होऊन म्हणाल्या. पण एकदम कमरेंत एक कळ आल्यामुळें त्यांचा सारा आवेश गोठला. “ सखूनं सांगितलं.”

“ सखू–अ–मोलकरीण ? ” पुरावा भक्कम नाहीं असें दर्शविणाऱ्या स्वरानें ते म्हणाले.

“ सखू असली म्हणून काय झालं ? तिला का डोळे नाहींत ? प्रत्यक्ष तिनं पाहिलं. ” पकडलेल्या कैद्याच्या अंगठ्याशीं जुळणारा खिडकीच्या

तावदानावर उमटलेला अंगठ्याचा ठसा जसा जज्जापुढें हजर करावा तशा ऐटीनें काकू म्हणाल्या, "गौर पहायला बोलवायला मीं सखूला पाठविलं होतं. तिथं हा फार्स चालला होता. तिनें लांबूनच पाहिलं आणि धांवत आली."

गोपाळराव साशंक दिसूं लागले.

"बरं, येवढ्यानं नसेल खात्री होत, तर मी सांगतें, मीही तिला तिकडे जातांना पाहिलं आहे."

"पण ती तेथेंच जाते हें कशावरनं? देवाला जात असेल."

"अगबाई! देवाला! कुणाला माहीत त्यांचा देव अन् धर्म निराळा असला तर! पण तात्यासाहेब! मुलीची चाल पाहून ती कुठं चालली आहे हें जर मीं ओळखलं नाहीं तर सहा पोरांची आई मी उगीच झालें म्हणायची! अहो, माझ्या भावाच्या वेळीं मुलगी दाखवायला आणली होती—मीं म्हटलं, ही हाताळ निघणार! माझं कोणीं ऐकलं नाहीं—पण तस्सं झालं!—ती हाताळ निघाली. नुसती मुलगी चालतांना पाहिली—मग तिच्या डोळ्याचा रोख कोठेंका असेना—मी बरोबर ओळखतें—ती कोठें जाणार." (हा कदाचित् बाळीच्या दृष्टीचा व चालीचा अनुभव असेल.)

पण इतका भरभक्कम पुरावा गोपाळरावांना पुरेना.

आपल्या बोलण्यावर त्यांचा भरंवसा बसत नाहीं हें पाहून काकूंना राग आला. व काय होणार असेल तें होईल, आपला मुद्दा सिद्ध करून दाखवण्याचें त्यांनीं ठरविलें. "सखूवर विश्वास नसेल अन् मीही खोटं बोलत असेन तर—असं कशाला? तिथं प्रत्यक्ष जाऊनच पहा."

पण ही कल्पना गोपाळरावांना पसंत पडली नाहीं. यांत कांहीं तरी स्वतःला कमीपणा आहे असें त्यांना वाटलें. यदा-कदाचित् खरें असलें तर ? आपली बायको दुसऱ्याच्या गळ्यांत गळे घालून बसलेली पहावयास जाणें त्यांना अप्रशस्त वाटलें.

पण काकू हट्टाला पेटल्या. माझ्यासारख्या पोक्त बाईचा शब्द खोटा करूं पहातात ! मी म्हणतें तें खरं आहे, असं दाखवीन तरच राहीन.

" तात्यासाहेब, असं घोंगडं भिजत पाडूं नका. तुम्ही एकटे जायला भीत असाल तर मी येतें तुमच्याबरोबर. खोटं असलं तर जीभ कापून देईन........तें कांहीं मी ऐकणार नाहीं. माझ्या बरोबर तुम्हांला आलंच पाहिजे ! " काकूंनीं जवळ जवळ गोपाळ-रावांची बाही धरली !

नाइलाजास्तव गोपाळराव व काकू निघाल्या.

* * *

अनपेक्षितपणें वत्सला आपल्या घरीं पाहून डाक्तरांना आश्चर्य वाटलें व आनंदही झाला.

" अखेर सत्याचाच जय झाला ना ? मिळाली का शेवटीं मुभा ! "

पण वत्सला गंभीर होती.

" वत्सलाताई, तुम्ही— पळून तर आलां नाहीं ? " सुशिलेनें विचारलें.

" विचारून न येतां सांगून मी येणार होतें पण—"

" वत्सले ! " सुशीला अमळ रागानें म्हणाली, " तुझं हें करणं बरोबर नाहीं ! "

वत्सलेनें सर्व हकीकत सांगितली.

डाक्तर म्हणाले, "हो–पण–मला वाटतं वत्सलाताई, गोपाळरावांना जर आवडत नसलं—तर–मी म्हणतों—"

सुशीलेनें ज्यास्त स्पष्टपणें म्हटलें, " नाहीं, वत्सले, तूं इथं क्षणभरही राहूं नको. परत आपल्या घरीं जा. तूं इथं आलीस तर मला किती आनंद होतो ! पण–तुझ्या पतीच्या मर्जीविरुद्ध—रहूं नको. मी कांहीं वाईट सांगत नाहीं. घरीं जा—पतीला विचार—तुझ्याकरतां मी विचारतें–आणि मग ये. पण असं चोरून—"

वत्सला रडूं लागली. " तुम्हींच मला असं हिडिसफिडीस केलं " ती स्फुंदत म्हणाली—" किती मी अभागी ! घरीं सुख नाहीं—नाहीं, सुशीले, मी जाणार नाहीं, पण पूर्वीप्रमाणें रोज येणार. तुम्हीं नको म्हटलं तरी येणार. माझ्याकडून करायचं मीं केलं. ते म्हणाले, 'मला कांहीं विचारूं नको.' माझ्याकडं आतां मुळींच दोष नाहीं. त्या घरांत एकटं बसून मला गुदमरल्यासारखं होतं. "

त्या दिवशीं तिनें पेटी वाजविली नाहीं. तिचें मन स्वस्थ नव्हतें.

दुसऱ्या दिवशीं पुन्हा ती गेली. आजही पूर्वीसारखा उल्हास तिला नव्हता. पण कशी तरी तुटक तुटक ती पेटी वाजवूं लागली. जितके शोकजनक राग तितके ती वाजवूं लागली. मधुनच ती रडूं लागे, हुंदके देई व डाक्तर तिचें सांत्वन करीत. सुशीला चहा करावयास गेली. डाक्तरही कोठेंसे बाहेर गेले. नानासाहेब व वत्सला दोघेच आतां खोलींत राहिलीं. बरेच दिवसांत तिनें आपल्या आवडीचें पद वाजविलें नव्हतें. ती वाजवूं लागली. " बाळपणींचा काळ सुखाचा ........" आतां तिला अवसान चढलें. किती वेळ तरी, आणि नाना

तऱ्हेनें तिनें अंतराच वाजविला. हळुहळू ती गाऊं लागली. आधीं गुणगुणत—मग स्पष्ट—मग मोठ्यानें. ऐकायला नानासाहेब आणि पद आवडतें—मग काय ? ती त्या नादांत तल्लीन झाली. 'सा' 'री' आणि 'ग' या बाहेर कांहीं जग म्हणून गोष्ट आहे हें ती विसरली. नानासाहेब खुर्चीच्या हाताजवळ जरा पाठीमागें उभे होते. मधुर ताना आणि आलाप यांनीं घर भरून गेलें. ती गात होती—
" मनिं नव्हती कशाची चिंता । आक्रोश कारणापुरता ॥ जें ब्रह्म काय तें मायबाप ही जोडी—"

इतक्यांत तिचे पाय थांबले, बोटें लुळीं पडलीं, व पेटीचा आवाज नाहींसा झाला. एक अत्यंत दीर्घ सुस्कारा सोडीत व स्फुंदत ती पुटपुटली, " पण तेंही सुख मला ठाऊक नव्हतं ! " व असें म्हणत तिनें मागें मान टाकली.

जितक्या साहजिकपणें आणि न जाणून तिनें मागें मान टाकली तितक्याच झटदिशीं आणि जाणतेपणें तिनें चपापून ती उचलली. पण खाड्दिशीं दार उघडल्याचा आवाज झाल्यामुळें ती उचलली, कीं कोणाच्या तरी छातीचा स्पर्श झाला म्हणून चपापली ?

दोघांनीं मागें वळून पाहिलें.

काकू गोपाळरावांना म्हणत होत्या, " हा सूर्य आणि हा जयद्रथ, झाली खात्री ? "

रागवावें कीं ओशाळावें हेंच गोपाळरावांना समजेना.

नानासाहेब रागानें व आश्चर्यानें तिकडे पाहूं लागले.

वत्सलाही प्रथम गांगरून गेली पण अभिमानानें तीही तोंडाला तोंड देऊन पाहूं लागली.

इतक्यांत डाक्तर आले. त्यांनाही हा प्रकार कळेना.

“ डाक्तर सुद्धां याला साक्षी आहेत—आणि सुशीले, बरं झालं तूं आलीस—तूंही साक्ष आहेस.” काकू म्हणाल्या.

आतां डाक्तरांच्या डोक्यांत प्रकाश पडूं लागला. ते वाघासारखे चवताळून म्हणाले, “ काकू, काय चावटपणा चालविला आहे तुम्हीं हा ? ”

काकू किंचित स्मित करून म्हणाल्या, “ मीं नाहीं. तुमच्या पाहुण्यांनीं ! ”

“ असो. पण तुमचा पाहुणचार करण्याची माझी सध्यां लहर नाहीं.” असें म्हणून त्यांनीं तिला हातांनीं धरून दरवाज्याची वाट दाखविली.

“ मी आपल्या वचनांतून मुक्त झालें. ”

“ होय—जातां कां तुम्हांला पूर्ण मुक्ति देऊं ?” ते म्हणाले.

नंतर गोपाळरावांनीं शांत चित्तानें नानासाहेबांनीं केलेलें स्पष्टीकरण ऐकलें. पण अत्यंत संशयित मुद्रेनें ते घरीं परतले.

*　　　*　　　*

या प्रकारानंतर एकत्र राहणें शक्य नव्हतें. मुंबईस—अगर कोठें तरी पृथ्वीच्या पाठीवर—गांव सोडून जावेंसें तिला वाटलें.

तिनें आपलीं लुगडीं व पातळें बांधलीं. आणि जाण्याची तयारी केली. गोपाळराव कोर्टांत जावयास निघाले तेव्हां तिनें त्यांना डोळे भरून पाहून घेतलें. नंतर डोळे पुसून ती नानासाहेबांकडे गेली.

तिसऱ्या दिवशीं गोपाळरावांना पुढील पत्र आलें.

“ माझ्या अंतःकरणाला किती यातना होत आहेत तें माझे

मलाच माहीत. तुमच्यावर जर माझं प्रेम कधींच नसतं, तर मीं रागावलें असतें व तो रागही कांहीं काळानें विसरलें असतें—पण या यातना मरेपर्यंत राहणार. इतःपर तुमच्या आणि माझ्या दोघांच्या सुखाकरतां आपण निराळें राहणेंच बरें. या सगळ्याचं कारण मला पाहतांना आपण योग्य निवड केली नाहींत. आपली मैत्री संभवते पण एकत्र राहणें शक्य नाहीं. मी नानासाहेबांच्या आणि काकूंच्या मदतीनं एक गाण्याचा आणि पेटीचा क्लास काढून उपजीविका करण्याचा संकल्प केला आहे. त्याला आपला आशिर्वाद असला म्हणजे झालें, एवढेंच मागणें आहे. कधीं काळीं आपली गांठ पडली तर आपण पतिपत्नीच आहोंत पण पतिपत्नी म्हणून संसार करणें अव्यवहार्य आहे, हें दुर्दैव. झोंपाळ्यावर झोंके घेतांना तुम्हांला घेरी येते, मला आनंद होतो. आपली जरी मैत्री असली, तरी एका झोंपाळ्यावर बसणें आपल्याला शक्य नाहीं!"



# विरक्ति कीं भित्रेपणा

समोरील घराच्या दरवाज्याजवळ एक रामदासी भिक्षा मागत होता. वासुदेवराव व त्यांची पत्नी रुक्मिणी यांना आपल्या घरांत तें ऐकूं आलें. वासुदेवराव ओटीवरील झोंपाळ्यावर बसून वर्तमानपत्र वाचीत होते व रुक्मिणी वाती करीत बसली होती. वर्तमानपत्रावरून डोळे काढून वासुदेवरावांनीं तिकडे पाहिलें व सहज म्हटलें, " हे आले एक बोके संन्यासी ! " रुक्मिणीनेंही वर मान करून पाहिलें. तो पाठमोरा होता.

" असं काय ? " त्या म्हणाल्या. " एकाद्याला उगीच असं उणं कां म्हणून बोलावं ? "

" उणं ? उणं कोण काढताहे ? मला तर ह्या चोरांत कांहींच उणं दिसत नाहीं. कसा माजला आहे पहा गलेलठ्ठ. आलाच तो इकडे. डोक्याला रुमाल, अंगांत कफनी, पायांत वहाणा अन् फुकटचें खायला ! शिवाय—"

" श्रीगुरुदेव दत्त. " वासुदेवरावांच्या घराच्या दाराच्या पायऱ्यापाशीं संन्यासी दत्त म्हणून उभा राहिला.

तिकडे दुर्लक्ष करून वासुदेवराव पुन्हा वाचण्याचें सोंग करूं लागले. रुक्मिणी तांदूळ आणण्याकरतां उठूं लागली. वर्तमानपत्र आड धरून तोंडांतल्या तोंडांत हलकेंच पतिराज म्हणतात. " जाऊं दे. कांहीं नको घालूं. " पण पतिराजांनीं संन्याशाकडे जितकें दुर्लक्ष केलें होतें त्याहून पतिराजांच्या या कानगोष्टीकडे अधिक दुर्लक्ष करून

व त्या रामदासीबुवांना थांबण्याचा इशारा देऊन रुक्मिणी आंत गेलीच. ती गेली असें पाहिल्यावर त्या बोक्याला बाहेरच्या बाहेर शुक् करण्याचा विचार वासुदेवरावांच्या मनांत क्षणभर येऊन गेला पण त्यांनीं गय केली.

रुक्मिणी परत आली व दरवाजाजवळ भिक्षा वाढण्यास गेली. रामदाशाला जवळून पहातांच तिला कसली तरी आठवण झाली. तिनें कांपऱ्या हातानें घातलेली भिक्षा रामदाशानें झोळींत घेतली. 'अष्टपुत्रा सौभाग्यवती भव' असा आशिर्वाद देऊन तो चालता झाला. त्यालाही कसली आठवण झाली काय? पण झाली असली तरी त्याची मुद्रा विशेष पालटली नाहीं.

रुक्मिणी पुन: वाती करूं लागली. ती कांहींतरी आठवत होती.

"घातली भिक्षा?" वासुदेवरावांनीं म्हटलें, "काय पुण्य मिळवलं? मांजर दूध प्यायलं तर मात्र त्याला लाटणं बसतं! त्या बोक्यांत आणि ह्या बोक्यांत फेर काय? दोघेही दुसऱ्यावर उपजीविका करतात. दोघांनाही मुलं—बाळं होतात. दोघेही धष्टपुष्ट असतात. मांजर रात्रीं चोरून दूध पितं आणि हे उघड दिवसा भिक्षेवर डल्ला मारतात व रात्रीं चोऱ्या करतात, एवढाच फरक! घरांत बिळं करून भिंती पोखरणाऱ्या उंदरांना मांजर नाहींसं तरी करतं पण हे रात्रीं भिंतींना भगदाडं पाडायला कमी करीत नाहींत! म्हणे साधू—संन्यासी! रामदासीबुवा! उगीच नाहीं म्हणत बोके—संन्यासी! कां? राग आला वाटतं? बकध्यान माहीत आहे ना कसं असतं तें? त्यांतलेंच हें एक ध्यान!"

पण रुक्मिणीचें इकडे लक्ष नव्हतें. तिला आठवलें. मागें रुक्मि-

णीला यांनाच दाखविली होती. त्यावेळीं ते अबकारी खात्यांत हपीसर होतें. लग्न ठरलं होतं. पण आयत्यावेळीं त्यांनीं नाहीं म्हणून सांगितलें होतें व मग वासुदेवरावांशीं ठरलें. ती गोष्ट आठवून तिला प्रथम कसेंसेंच झालें. जो आपला पति झाला असता त्यालाच आज आपण भिक्षा वाढली ! ज्यानें तिलाच पदरांत घ्यायची तिच्या ओंचांतील भिक्षा आज त्यानें पदरांत घेतली ! ! दैवाच्या विचित्र गतीबद्दल तिला अचंबा वाटला व तो आपला पति झाला नाहीं याबद्दल तिला मना-पासून—अगदीं मनापासून कितीतरी आनंद झाला, समाधान वाटलें.

देवाला तिनें दुवा दिला. तरी पण या विचित्र योगायोगामुळें तिला चमत्कारिक वाटलें. व क्षणभर ती तेथेंच आडवी झाली.

" का ?—काय झालं ? " वासुदेवरावांनीं विचारलें.

" पोट दुखताहेसं वाटतं पुन्हा. "

अलीकडे रुक्मिणीबाईंना पोटदुखीचें दुखणें लागलें होतें.

" सोडा देऊं का ? " वासुदेवरावांनीं विचारलें.

" नको राहील. कांहीं त्या सोड्यानं होत नाहीं. "

" औषध घ्यायचं नाहीं अन् उगीच नांवं ठेवायची ! थांब, मीच देतों आणून. " असें म्हणून त्यांनीं पाण्याबरोबर सोडा दिला.

लवकरच रुक्मिणी पुनः वाती करूं लागली.

" बघ, राहिलं कीं नाहीं लागलीच ! हट्टाला मात्र औषध नाहीं."

इतक्यांत चहाची वेळ झाली म्हणून उठून त्या स्वयंपाक घरांत गेल्या. पाठोपाठ वासुदेवरावही गेले. " पहा, सोड्यानं कसं राहिलं. बाकी इतकं तुला कळून आलं असेल कीं दुखण्याकरतां दैविक उपा-यांत निदान अर्थ नाहीं. हें दुखणं जावं म्हणून तूं देवाधर्माचं

सवाष्ण–ब्राह्मणाचं खूळ काढलं आहेस. आतांच त्या गोसावड्याला तांदूळ घातलेस पण त्यामुळें उलट पोट दुखूंच लागलं ! आणि सोड्यानें गेलं. असं अपात्रीं दान तरी निदान करूं नये. झालं, आतां पुन्हा चहा पिऊन तूं प्रकृति बिघडविणार ! डॉक्टरनं तर चहा अजीबात वर्ज करायला सांगितलं आहे. "

" हो ! कांहींच तरी काय. कांहीं मेल्या त्या डॉक्टरांना समजत नाहीं. आज दोन महिने झाले पण काडीचा गुण आहे का ? "

" कशाला असेल. इकडे चहा ढोसायचा आणि औषध घ्यायचं नाहीं, मग कशाला येईल गूण ? "

" पुष्कळ करून पांहिलं. औषधं घेतलीं, चहा सोडला, हवा-पालट केली–पण कांहीं झालं नाहीं. मग कशाला पथ्य तरी इतकं करायचं ? "

" अग, ह्याला दिवस लागतील. "

कांहीं वेळानें दोघेही चहा पिऊं लागले. वासुदेवराव म्हणाले, "मला राहून राहून या ' साधूंचा ' असा राग येतो कीं वाटतं एकेकाला धरून तुरुंगांत टाकावें आणि चांगले कामाला जुंपावेत. "

" हें काय ? त्यांनीं काय पाप केलं आहे ? वाटलं तर घालावी भिक्षा, नाहीं तर नाहीं. बळजबरी नाहीं. तेवढ्यानं कांहीं घरांतले तांदूळ कमी होत नाहींत. "

" म्हातारी मेल्याचं दुःख नाहीं पण काळ सोकावतो. यांना काम करून पोटाला मिळवायला काय झालं ? ते कोणतं पाप करीत नाहींत ? आपल्या देशांतच यांचं प्रस्थ फार आहे. "

" पण सगळे कांहीं भोंदू नसतात. कांहीं असतील. पण भोंदू आहे असं ठरलं नाहीं तोंवर भिक्षा घालायला काय हरकत आहे ? "

" मी तर म्हणेन कीं तो खरा साधू आहे अशा पुराव्याखेरीज त्याला दाराशींसुद्धां उभा करूं नये. यांपैकीं बहुतेक चांगले आहेत असं तूं समजून चालतेस, पण मी असं धरून चालतों कीं बहुतेक स्वार्थसाधु असून खरा असा एकादाच निघायचा. "

" पण गुन्हा शाबीत करणारा पुरावा देणं फिर्यादीचं काम आहे, असं इकडेच ना म्हणायचं. "

" तें इतरांच्या बाबतींत. ही म्हणजे ' गुन्हेगारांची जातच ' आहे. आपण निर्दोषी आहों असं त्यांनींच सिद्ध केलं पाहिजे. बाकी कित्येक सर्टिफिकीटं सुद्धां घेऊन येतात म्हणा. पण ते अगदीं अट्टलच असतात."

" हा इकडचा पूर्वग्रह आहे. "

वाऱ्याशीं भांडण्यांत काय अर्थ आहे अशा अर्थानें चहाची पातेली उचलून नेत रुक्मिणी म्हणाली. पोटदुखी लागल्यापासून देवाधर्माकडे रुक्मिणीचें विशेष लक्ष लागलें होतें. लोकांवर विनाकारण पतिराजांनीं आग पाखडलेली पाहून तिला राग आला व वाईट वाटलें. तें ओळखून पतिराज म्हणाले, " कां ? तुला काय वाटतं, कदाचित् देवच त्या रामदाशाचं रूप घेऊन आला असेल होय सत्त्व पाहायला ? "

" त्याला सुद्धां नशीब लागतं. " विशेषतः या साधूविषयीं रुक्मिणीच्या मनांत एक प्रकारची कींव उत्पन्न झाली होती, व पतीचें बोलणें तिला मुळींच रुचलें नाहीं.

त्या रात्रीं तिनें देवाचे आभार मानले. त्या मनुष्याला आपल्याला दिली असती तर आज आपली काय स्थिति झाली असती ? त्याच्या

मागोमाग आपल्यालाही दारोदार वणवण करीत हिंडावें लागलें असतें! ‘ बरं झालं ग बाई ! ’ ती मनाशींच म्हणाली, ‘ त्यांनीं लग्न मोडलं. ’ सध्यांचें सुख तिला जाणवलें. आपण आतां किती सुखी आहों, पति किती हुषार आहे, पैसेही पुष्कळ आहेत आणि ते मला किती जपतात, माझ्या दुखण्याची किती काळजी करतात, पैशाकडे पहात नाहींत. दुखण्याखेरीज सर्वतोपरी आपण आनंदांत संसार करीत आहोंत. पतीबद्दलचें तिचें प्रेम अधिकच बळावलें व एकाग्रदृष्टीनें ती निद्रिस्त पतीच्या मुखाकडे पाहूं लागली व तिच्या गालांवर स्मिताचा एक खळगा पडला. तिनें त्यांच्या डोक्यावरून हात फिरवला पण ते जागे होतील या भीतीनें तो लगेच काढून घेतला. चुकून जागे झाले तर तिला पाहिजेच होतें. त्यांना सगळी हकीगत सांगतां आली असती व त्यांच्याच पदरीं पडल्यामुळें आपण किती धन्य झालों हें ऐकून त्यांनाही आनंद झाला असता पण वासुदेवराव जागे झाले नाहींत. ‘ उद्यांपासून चहा सोडावयाचा व वेळच्या वेळीं औषध घ्यायचें ’ असा मनाशींच संकल्प करीत व प्रेमळ पतीच्या चिरसहवासांत कसकसा संसार करायचा याचें कल्पना-चित्र रंगवीत तीही गाढ झोंपी गेली.

* * * *

आठ दिवसांनीं फिरून ‘ श्री गुरुदेव दत्त ! ’—तोच आवाज या दांपत्याच्या कानीं पडला. यावेळींही वासुदेवराव एक पत्र वाचीत होते व रुक्मिणीबाई सवाष्णीला देण्याकरतां एक खण निवडीत होत्या. त्या तांदूळ आणण्याकरतां उठल्या. वासुदेवरावांना वाटलें आतां जरा या रामदासाची मजा करावी. म्हणून ते म्हणाले, “ काय बुवा, तुम्ही नवेच आलां वाटतं या गांवाला ? ”

" नाहीं. मी मूळचा इथलाच रहाणारा. कामानिमित्त परगांवीं असतों पण नुकताच पुन्हा या माझ्या जन्मभूमीला आलों. पण तसें म्हणाल तर या जगांत आम्हांला नवीन असें कांहींच नाहीं. नांव आणि वेष यांत काय तो पालट. मूळांत सर्व एकच. काशी काय आणि रामेश्वर काय. तरी पण व्हावा तितका मनोविजय न झाल्यानं एखाद वेळ माझ्या या जन्मभूमीच्या गांवीं यावं असा मोह उत्पन्न होतो."

" एकूण कफनीनें कांहीं मोह झांकला जात नाहीं ? "

" नाहीं. जोंपर्यंत मनोदमन झालें नाहीं तोंपर्यंत कांहीं नाहीं. आधीं इच्छा पाहिजे मग प्रयत्न. विचारालाच पटत नसल्यास किंवा इच्छेविरुद्ध संन्यास घेण्यांत अर्थ नाहीं. पण विचाराला संमत असून मनापासून इच्छा असली म्हणजे प्रयत्नांनं जिंकतां येतें. लाडावलेल्या इंद्रियांना ताळ्यावर आणायला वेळ लागेल. तें यत्नसिद्ध आहे. संसारी मनुष्य जसा केव्हां त्रस्त होऊन संन्यास घेण्याची इच्छा करतो तद्वतच संन्यस्त मनुष्याला केव्हां केव्हां कंटाळा येऊन संसारी बनावसं वाटतं. पण हें वाटणं दोघांच्याही बाबतींत तात्पुरतं असतं. जो पूर्ण विरक्त बनला त्याविषयीं मी बोलत नाहीं. तो मुक्तच. पण आमच्यासारख्यांची गोष्ट सांगतों. कारण अजून आम्हांला पुष्कळ जय मिळवायचा आहे, म्हणून केव्हांतरी येथें येऊन जावेंसें वाटतें. "

इतक्यांत रुक्मिणी आली. तिला एक प्रकारें त्या रामदाशाचा राग आला होता, एक प्रकारें कींव आली होती व एक प्रकारें कसेंसेंच वाटत होतें. तें शेवटचें वाक्य ऐकून तर ती विस्मितच झाली. याही खेपेला कांपऱ्या हातानें भरकन भिक्षा घालून ती परत आंत गेली. गेल्या शनिवारीं तो आला होता. व आजही शनिवार. पुढील शनि-

वारीं—दर शनिवारीं तो येणार काय ? एकीकडून तिला वाटे तो दर शनिवारीं—दररोज यावा व एकीकडून तो पुन्हा कधींच न येईल तर बरें असें वाटावें. पुढल्या शनिवारीं दुपारींच त्याला टाळण्याकरितां कुणाच्या तरी घरीं बसायला जायचें तिनें ठरविलें. त्याच्याबद्दल कींव करावी, सहानुभूति बाळगावी कीं त्याचा राग करावा हेंच तिला समजेना. त्यानें आपल्याला कदाचित् ओळखलेंही नसेल, व म्हणून येथें यायला त्याला कांहीं वाटत नाहीं. आडून ती ऐकूं लागली.

" पण काय हो, तुम्ही तर रामदासी आणि दत्ताचें नांव काय म्हणून घेतां ? "

" कोणतंही नांव प्रेमानें—भक्तीनें घेतलें तरी तें देवालाच पोहोंचतें. तुम्ही आपल्या मुलाला नाहीं का अनेक लाडक्या नांवानें संबोधित ? तसें म्हणाल तर तुम्हांला दिसतो किंवा वाटतो तसा संन्यासी मी नाहीं. परमेश्वर एक आहे. जो मुसलमानांचा, यहुद्यांचा, ख्रिस्त्यांचा तोच आमचा. धर्म धर्म म्हणून म्हणतात त्या धर्माचा आणि देवाचा तसा कांहीं संबंध नाहीं. माझा धर्म म्हणजे नीति आणि भक्ति, बंधु-प्रेम, ज्ञान, सेवा. धर्म म्हणजे एक मतविशेष. जसें स्त्रीशिक्षणाबद्दल किंवा पुनर्विवाहाबद्दल मतभिन्नता असते तरी दोघेही एकाच हिंदू धर्माचे असतील. पण केवळ या मतावरून त्यांच्या जाती पाडल्या आहेत काय ? तद्वत् धर्माची विविधता हा भिन्न मतांचाच एक प्रकार आहे. त्याला अर्थात् जात नाहीं व त्याला आपण जें स्वरूप दिलें आहे तें योग्य नव्हे. खरा धर्म जात-गोत जाणत नाहीं. परंतु ज्याला आपण चुकीनें धर्म म्हणतों तो खरोखर फक्त आचारच होय. जसें मांसभक्षण, वगैरे. व रोटीबेटी व्यवहाराला खरी अडचण खऱ्या उच्च-तम धर्माची नसून भाषेची व आचाराचीच आहे. "

वासुदेवरावांचे या गोसावड्याबद्दलचें मत बदलत चाललें. (हजारांतील एक तो हाच ?) त्यांनीं त्यास बसावयास सांगितलें.

" बुवा, " हातांतील पत्र मांडीखालीं सारून व जरा पुढें सरकून ते म्हणाले. " तुम्ही जें म्हणाला कीं मी बाहेरगांवीं कामानिमित्त असतों—तर तें काय काम ? तुम्ही तर संन्यासी ? "

" सेवा—सेवा धर्म, सर्व संग परित्याग करून रानांत जाऊन ईश्वरचिंतन करणं यानें तर मोक्ष मिळेलच पण स्वतःचा संसार सोडून लोकसेवा करून त्यांच्या कल्याणार्थ झटणं यांतही मोक्ष मिळेल. रानांतच जायची जरूरी नाहीं. यानें दोघांचाही फायदा होतो. मी अशाच एका लोकोपयोगी संस्थेंत काम करीत असतों. माझं घरदार होतं—बायको होती—पण मेली—मूल लगोलग गेलं—आणि मला पुन्हा लग्न करावंसं वाटेना. खरं म्हणाल तर एके ठिकाणीं वाङ्निश्चयही झाला होता पण आयत्यावेळीं मीं लग्न मोडलं ! माझं मनच घेईना ! मीं घरदार विकलं व पैसे त्याच संस्थेला दिले व त्या संस्थेचें काम पहातों. दोन चार दिवसांनीं मी परत—"

इतक्यांत कोणी मित्र वासुदेवरावांकडे आले. त्या नादांत रामदाशास्त्रीवरील त्यांचें लक्ष उडालें व तें ओळखून बुवानींही ' शतायुषी भव । ' असा आशिर्वाद देऊन आपला पाय काढला.

रुक्मिणीनें आंतून सर्व ऐकिलें होतें.

मित्र म्हणला, " का, साधुसंताच्या नादीं लागला कीं काय आपण ? "

" मी ? अन् साधु संत ? विहीरींत उडी टाकीन पण असल्या भोंदूच्या फंदांत पडणार नाहीं ! सुतकट्टीच्या बेरडांच्या टोळींत शिरेन

पण मठा–बिठांत पाऊल घालणार नाहीं !—अरे, उगीच टवाळी करीत होतों त्याची. साऱ्या मुलखाचे बेरड हे ! लुच्चा सांगत होता ब्रह्मज्ञान ! देव असा नि खरा धर्म तसा. इंद्रियदमन काय आणि सेवा काय ! शेवटीं कबूल केलंनच कीं आपण मनाला जिंकलं नाहीं म्हणून. वाटतं म्हणे ‘ यावसं इकडे कधीं कधीं ’! असेल इथं एकादी ! दुसरं काय आणि म्हणे घरदार विकलं ! गहाण टाकलं ! असेल तिच्या नादीं लागून. टांच आली असेल घरावर अन् काय ? तिच्याकडे येत असेल लाळ घोटायला पण तिनं फिरवला असेल वरवंटा ! संस्थेचें काम पहातों म्हणे ! असेल एकादा फंड गुंड ! नाहीं तर लुटारूंची संस्था ! काय लेकाच्याची वकीली तरी. याचं म्हणें लग्न जमलं, पण यानं मोडलं. स्वारीचा रंग-ढंग पाहून मुलीच्या बापानेंच दिल्या असतील हातावर तुरी झालं ! जन्मभूमीला यावंसं वाटतं लेकाला. ही त्याची नव्हे जन्मभूमि;—त्याच्या मुलांची !—अग–ऐकते आहेस कां ? ”

त्या रामदाशाच्या बोलण्यावरून वासुदेवरावांचा ग्रह जरी बदलत चालला होता तरी मित्रासमक्ष पुन्हा त्यांच्या पूर्व ग्रहानें उचल खाल्ली. त्या गोसाव्याबद्दल चांगलें मत बनणें हें त्यांच्या आजपर्यंतच्या अभिमानाला एक प्रकारें शोभेसें नव्हतें, तो एक तऱ्हेचा पाणउतारा—पराभव होता, म्हणून, वाटलें त्यापेक्षां, त्या संन्याशाच्या कृतींची अधिकच भडक रंगांत त्यांनीं उठावणी केली. ती ऐकून आपल्या पत्नीला वाईट वाटेल असें लक्षांत आल्यावर त्यांनाही थोडें शरमल्यासारखें झालें.

“ कां ? ” ते आंत असलेल्या पत्नीला उद्देशून मोठ्यानें म्हणाले,

" आवडलें नाहीं ना माझें बोलणें ? म्हणजे याच रामदाशाबद्दल मी म्हणत नव्हतों. पण तुला वाईट वाटत असेल तर मी बोलणार नाहीं. बाकी हा मनुष्य कांहीं अगदींच लफंग्यापैकीं दिसत नाहीं—"

रुक्मिणी आंतून म्हणाली, " मला वाईट वाटण्याचं कारण काय ? "

ती कदाचित् असेंहि बोलून गेली असती कीं,—' त्याचं नि माझं लग्न थोडकंच लागलें आहे ! ' परंतु या विशेष परिस्थितींत असें म्हणणें अत्यंत गैरशिस्त झालें असतें.

तिला एकदां अशीही शंका आली कीं याचें लग्न मोडलें तें माझ्याशींच असें आपल्या पतीला समजलें कीं काय ? किंवा पूर्वीं-पासूनच त्यांना माहीत आहे कीं काय ? पण छेः तसा संशय यायला कांहींच आधार नव्हता. उलट ' असेल त्याची एकादी येथें ' या वाक्यावरून तर त्या गोष्टीचा त्यांना गंधही नाहीं हेंच सिद्ध होत होतें.

रामदाशाच्या वकिलीवर वासुदेवरावांनीं लढविलेल्या कोटिक्रमाचा रुक्मिणीवर मुळींच परिणाम झाला नाहीं असें मात्र नव्हे. पुष्कळ लोक तसे असतील पण हा तसा होता कीं काय ? किंवा असेल काय ? नाहीं. ज्याच्याशीं आपलें लग्न ठरलें तो इतका वाईट निघावा हें तिच्या अभिमानालाही लाजिरवाणें होतें. तो मनुष्य आपल्याकरतांच येथें आला कीं काय अशीही तिला शंका येऊन गेली. ' मन चिंती तें वैरी न चिंती, ' हेंच खरें.

पण ते बुवा दोनचार दिवसांत परत जाणार होते. ती गोष्टच डोळ्यासमोरून जाईल हें समाधान होतें. ती गोष्ट अशा संशयित स्थितींत असतां पतिराजांना कळविणें इष्ट नव्हतें. आधींच सांगून

टाकली असती तर हरकत नव्हती. पण आतां नको. इतक्या वाईट मनुष्याशीं आपल्या बायकोचें लग्न ठरलें होतें ही कल्पनाही त्यांना कमीपणा आणणारी होती.

त्या गोष्टीला कांहीं दिवस लोटले. तो रामदासी त्यानंतर पुन्हा आला नाहीं. सर्वजणच ती गोष्ट विसरून गेले.

रुक्मिणीला दिवस राहिले. कित्येकांना वाटलें होतें कीं, आतां तिचें पोटदुखणें राहील पण तें वाढतच चाललें. ' गॅस्ट्रिक अल्सर ' म्हणजे अन्नाशयांत व्रण झाला आहे अशी शंका होती, पण कित्येकांच्या मतें ते डोहाळेच होते.

वासुदेवराव आणि रुक्मिणी यांचा आनंदांत संसार चालला होता.

*　　　*　　　*

पण एकाएकीं रिट्रेंचमेंटमध्यें वासुदेवरावांची नोकरी गेली ! वासुदेवरावांना अगोदर गुणगुण लागली होती व तेव्हांपासून दुसरीकडे नोकरीच्या खटपटीला ते लागले होते पण प्रथमपासूनच रुक्मिणीला सांगून तिला कष्टी करण्यास ते धजले नाहींत.

पण नोकरी गेल्याची बातमी कळली तरी वासुदेवरावांना वाटलें होतें तितकें रुक्मिणीला मुळींच वाईट वाटलें नाहीं. ' ही नाहीं तर दुसरी ' ती म्हणाली. वासुदेवराव हुषार होते व त्यांच्या कर्तबगारीवर तिचा पूर्ण विश्वास होता. पण तिला जग अजून समजलें नव्हतें. वासुदेवरावांच्यावर जसा तिचा विश्वास होता तसेंच इतर जगही तितकेंच विश्वासार्ह असतें तर ! पण हरप्रयत्न करून पाहिलें तरी कोठें नोकरी मिळेना. कमीपणाची नोकरी करायला ते तयार नव्हते, पण करतात काय ?

रुक्मिणीचे वडील श्रीमंत होते. एका मोठ्या खाजगी कंपनीचे ते मॅनेजर होते. तितकीच वेळ आली तर ते सहज काम लावून देतील असा रुक्मिणीचा भरंवसा होता. त्यामुळें नोकरीचें भय तिला मुळींच वाटत नव्हतें. वासुदेवराव तर अत्यंत खिन्न व मलूल झाले होते. त्यांच्या मन:स्थितीचें समग्र वर्णन देण्यापेक्षां तीं कल्पिलेलीच बरी. ते एकटे असते तर त्यांना कांहीं वाटलें नसतें, पण आतां बायकोची काळजी, तिचा आजार आणि शिवाय ती गरोदर. इतर लोकांनाही वासुदेवरावांच्या नोकरीबद्दल विशेष वाटलें नाहीं. मिळेल, असें इतरांना वाटे. शिवाय सासरा तर कोठें गेला नव्हता. पण ' जावें त्याचे वंशा तेव्हां कळे. '

अशाच एका ठिकाणीं वासुदेवरावांनीं अर्ज केला होता, ते साहेबाला भेटले होते, त्यानें पहातों म्हणून सांगितलें होतें व आज त्याचा अखेर निकाल होता. पण नकार मिळाला. हिरमुसले होऊन वासुदेवराव घरीं परतले. असलें काळें तोंड घेऊन घरीं जाण्याची देखील आज त्यांना लाज वाटली. बाहेरच कोठें वेळ काढावा—नाहीं तर जाऊन जीव द्यावा किंवा लांब कोठें पळून जावें असें त्यांना वाटलें. पण घरीं गेल्यावर त्यांना एक विसाव्याचें स्थान होतें.

निराश होऊन वासुदेवराव घरीं परतले. रुक्मिणी त्यांची वाट पहातच होती. त्यांना पहातांच तिनें उत्सुकतेनें विचारलें, " झालं का काम ? "

त्यांनीं लांबूनच सुस्कारा सोडून नकारार्थी मान हलवली.

" का ? काय म्हणाला तो. भेटला नाहीं वाटतं ? "

" काय म्हणतो डोंबल ! साहेब भेटला पण नाहीं म्हणाला—"

" हो खरं—तुम्ही तिकडे जाणार होतां नाहीं का ? पण त्या मोतीवाल्याकडे नाहीं का गेलां ? "

वासुदेवराव आपल्याशींच कांहीं पुटपुटले. " मला आली आहे भिक्षांदेहीची पाळी आणि हिला लागलेत दागिन्याचे डोहाळे ! "

" असं काय करायचं. इतकं नको वाईट वाटून घ्यायला. नोकरीचं काय. कुठंही मिळेल. आज नाहीं उद्यां. त्याकरतां नको जिवाचं पाणी करून घ्यायला. मी म्हणतें, नाहींच मिळाली नोकरी तरी मी आहेना ? आपण कुठेंहि पोट भरूं. मीसुद्धां कांहीं तरी करून पैसे मिळवीन. दळण—कांडणसुद्धां करीन. नाहीं तर चला ना ? बाबासाहेबांच्याकडे जाऊं. आतांच्या पेक्षां जास्त पैसे आपल्याला मिळतील. त्यांना कराचीला मॅनेजर हवा आहे. मागंच बाबूचं पत्र आलं होतं. पण इकडे आवडणार नाहीं म्हणून बोललें नाहीं. मग लिहूं का पत्र ?"

वासुदेवराव कांहींच बोलले नाहींत. त्यांचें चित्त ठिकाणावर नव्हतें. सासऱ्याकडून मदत, आाणि ती अन्नाला लावून देण्याकरतां ! !

* * *

" ही भल्याची दुनिया नाहीं. " वासुदेवराव विचार करीत होते. " गुणांचं चीज नाहीं. फक्त पैशाला मान आहे. ठकाला महा ठकच भेटला पाहिजे. पण आपल्या हातून तें होणं नाहीं. मन घेत नाहीं म्हणून व मनांत आलें तरी आपल्याला जमायचं नाहीं. काय ? अन्नालासुद्धां मी महाग व्हावं ना ? आणि कशाला लग्न करून बसलों !—तो रामदाशी आला तेव्हां मींच म्हटलं ना कीं, जग लुच्चं आहे असं समजून चालावं. ती म्हणे, एकाद्याच्या विरुद्ध पुरावा असल्याखेरीज लोक चांगले आहेत असें धरून चाललें

पाहिजे. कोठेंही नोकरीच्या याचनेला गेलों कीं (माझ्याच मताप्रमाणें) लोक मला लुच्चा समजून चालतात! मग त्यांना तरी मी दोष कां द्यावा?—तो रामदासी माझ्यासारखा खराच असेल काय? तो किती सुखी दिसत होता! त्याला कसली काळजी नाहीं. बायकोची दुखणीं त्याला काढायचीं नाहींत. दागिन्यांचा लकडा त्याच्यामागें नाहीं. मिळेल तें खायचं आणि देवाचं भजन करायचं. एक बरं आहे. ती माहेरीं आहे. माझं दुःख माझ्याच जवळ. तिला काय कल्पना? ती म्हणते बाबासाहेबांकडे जाऊं. पण अन्नाला लावण्याकरतां सासऱ्याकडे तोंड वेंगाडूं? नाहीं. कालत्रयीं नाहीं. आणखी प्रयत्न करून पाहीन: नाहीं तर बेहेत्तर, जीव देईन. परवांच त्या बंगाली एम्. एस्सी. माणसानं जीव दिला. कोणी म्हणोत वेडेपणा पण मी म्हणतों त्याची काय चूक? मला कल्पना आहे. तिची काळजी नाहीं. ती बापाच्या घरीं राहील. ते आनंदानं ठेवतील. माझं काळं तोंड त्यांना कसं दाखवूं? खरंच हा संसार म्हणजे माया आहे. जग कोणीकडे वहात जाणार समजत नाहीं. कलियुग हें माझ्यासारख्यांच्या जीवनाकरितां नाहीं! हल्लींचं जग लुच्यांचं, वाईटांचं, बोकेसंन्याशांचं आहे. असल्या पापी, घाणेरडया जगांत जगण्यांत तरी काय अर्थ आहे? 'का ते कान्ता कस्ते पुत्रः' म्हणून शंकराचार्यांनीं म्हटलें आहे तेंच खरें दिसतें. मीं कोण, कोठून आलों, मला कोठें जायचं आहे? मी नोकरी कशाकरितां पहात आहें? वेडेपणा, निव्वळ वेडेपणा. ही सगळी माया. आपल्याला ईश्वराशीं तादात्म्य पावावयाचं आहे. हेंच प्रत्येकाचं अंतिम ध्येय असलं पाहिजे. संसारांत कांहीं अर्थ नाहीं. संसारसुख हें मृगजळ आहे. खरं सुख त्यांत कधींच हातीं लागत नाहीं."

दर वेळीं वासुदेवराव शेवटचाच प्रयत्न करून पहात. आजही शेवटचाच प्रयत्न होता. मात्र हा शेवटचा प्रयत्न दोन्ही दृष्टींनीं शेवटचाच करण्याचा निश्चय ठरवून ते निघाले! आत्महत्त्येच्या निश्चयामुळें अर्जाचा कसाही निकाल ऐकण्याला एक तऱ्हेचें धैर्य त्यांना आलें. आतां त्यांची मनोवृत्ती अशी झाली कीं यांपैकीं कोणतीही गोष्ट त्यांनीं तितक्याच आनंदानें किंवा दुःखानें स्वीकारली असती. नोकरी लागली काय आणि जीव नाहींसा केला काय, सारखेच वाटूं लागलें.

त्यांना रुक्मिणीचीं वरचेवर पत्रें येत. आजच सकाळीं त्यांना तिच्या हातचें पत्र आलें होतें. "कुठें जमलं का? नाहींतर इकडे ताबडतोब या. मद्रासचा एजंट पुष्कळ दिवसांच्या रजेवर जाणार आहे. तिकडे तुम्हांला पाठविण्याचा बाबांचा विचार आहे. ते तुम्हांला निराळें पत्र लिहिणार आहेत. आमचं म्हणणं तुम्हीं तिकडे आतां दुसरी नोकरी धरूंच नये मिळाली तरी. मद्रासला फार दिवस नाहीं रहावं लागणार.

माझें पोट आतां बरें आहे, काळजी नसावी.

येतांना रेशमी कापड—चि. कुसुमकरतां तीन वार चांगल्यापैकीं आणावें. शिवण्याच्या यंत्राची चवकशी केली का?...उगीच मनाला लावून घेऊं नये....पत्र पावतांच निघून यावें."

वासुदेवरावांचा निश्चय ठाम होता.

पण त्या दिवशीं साहेबच भेटला नाहीं.

साहेब भेटला असता व त्यानें नकार दिला असता तर वासुदेवरावांनीं जिवाचा शेवट कदाचित् केला असता. पण दुसऱ्या दिवशीं

साहेबाच्या असिस्टंटनें 'सॉरी, सध्यां रिकामी जागा नाहीं' असा निकाल दिला.

एक सबंध दिवस विचार करण्यास अवकाश सांपडला. कांहीं असो त्या दिवशीं कांहीं वासुदेवरावांनीं आपला निश्चय तडीस नेला नाहीं. मग तें पत्र आदल्या दिवशीं आलें होतें म्हणून म्हणा किंवा त्यांचा धीर झाला नाहीं म्हणून म्हणा.

* * *

एके दिवशी सकाळींच रुक्मिणीबाई माहेरीं आपलें पोट शेकीत बसल्या होत्या. इतक्यांत धाकट्या मधूनें एक पत्र आणून दिलें. रुक्मिणीबाईनें तें वाचलें:—

"........दुनिया भल्याची नाहीं. कोठें गेलों तरी मी लुच्चा असेन असं धरून चालतात. कलियुगांत जगण्याकरितां माझा जन्म नको होता. मला जगाचा वीट आला आहे. लग्न करून तुला फसवलं याबद्दल क्षमा कर. मी तुला यापुढें केव्हांही दिसणार नाहीं. कोणालाच दिसणार नाहीं. मात्र जिवाचें बरेंवाईट करून घेत आहें असें मुळींच समजूं नको कारण तसें करणें पाप आहे. पुण्य जोडण्याच्या मी खटपटींत आहें. पापाच्या राशी उभारण्याकरतां नव्हे. तुला तेथें कांहीं कमी पडणार नाहीं अशी माझी खात्री आहे. माझा तसा तुझाही देव पाठीराखा आहेच. त्याच्याच सेवेंत मी आयुष्य घालविणार. जेथें क्षुद्र व नीच लोकांचा संपर्क देखील लागणार नाहीं अशा प्रभूच्या साक्षात्कारानें पुनीत झालेल्या एकांत ठिकाणीं मी जाणार. पत्र तुझ्या हातीं पडेपर्यंत गेलों असेन. माझा शोध करण्याच्या भानगडींत पडूं नका. मी कोणालाही सांपडणार नाहीं. व तुमचीही

निराशा होईल. देवाचा शोध मी करणार व शेवटीं त्याच्यांत विलीन होणार. हरामखोर जगाशीं टक्कर देण्याऐवजीं षड्रिपूंशीं मी झगडणार. पैशाच्या मागें लागण्या ऐवजीं त्या सच्चिदानंद परमेश्वराची मी कांस धरणार. अशाश्वत संसारसुखांत रमण्याऐवजीं मी चिरंतन अशा परब्रह्मज्ञानानंदांत डुंबणार. अज्ञानी मनुष्याची महत्त्वाकांक्षा काय ? तर पैसे मिळवीन. मान मिळवीन. मोटार ठेवीन. विलायतेला जाईन. संन्यास घेऊन परमेश्वरचिंतनानं सुखाचं धन चक्रवाढ व्याजानं आपोआप वाढत जातं. संन्याशाइतका अधिकार मोठ्या गव्हर्नराचा नाहीं. विलायतची सफर करण्याऐवजीं त्याहून लांब परमेश्वरापर्यंत माझा प्रवास आहे. मग मोटारपेक्षां शीघ्रगतीनं मी इच्छित स्थलीं पोहोंचणार. माझी आठवण विसर. तुलाही ईश्वरभजनांत गोडी आहेच. तूंही त्याचंच चिंतन कर. तोच तुला मोक्ष देईल. तेथें आपली गांठ पडेल...."

*　　　*　　　*

बाबासाहेबांनीं वासुदेवरावांचा अनेक रीतींनीं खूप शोध केला पण त्यांचा पत्ता लागला नाहीं. आपले जामात गोष्ट इतक्या थराला नेतील असें बाबासाहेबांच्या ध्यानींमनींही आलें नव्हतें. नाहीं तर केव्हांच समक्ष जाऊन त्यांची समजूत घालून त्याला त्यांनीं मार्गावर आणला असता. याकरतां एकदां ते गंगूला—आपल्या मुलीला—रागेंही भरले. पण गोष्ट होऊन गेल्यावर ते तरी काय करतात ?

गंगू आतां बाळंतपणाला टेंकली होती. तिची पोटदुखी वाढतच चालली. अन्नाशयांत व्रणही होता !

बिचारी गंगू ! तिला आतां सासरच उरलें नव्हतें ! ( तिला

'रुक्मिणी' अशी आतां कोण हांक मारणार ?) आपल्याच एक प्रकारच्या निष्काळजीपणामुळं गोष्ट इतक्या थराला गेली असें वाटून तिला 'दे माय धरणी ठाय' झालें. पण तिला तरी कुठें कल्पना होती, पतीनं आपलं दुःख आपल्याच पोटांत ठेवलं होतं. तिलाही दुःखाची वांटेकरीण त्यांनीं कां केली नाहीं ? आपणही इतके हे कसें ? आपल्याला कसं त्यांचं दुःख कळलं नाहीं ? हा त्यांचा चांगुलपणा कीं वाईटपणा ? अथवा ती कधींही माहेरीं गेली नसती; गेली असती तरी लागलीच परत आली असती. त्यांनीं एका शब्दानं तरी बोलून दाखवायचं ! भेटून जायचं ! कांहीं नाहीं. हातपाय हलवायला त्यांनीं जागाच ठेवली नाहीं !

जिवाला एकच विसांवा होता. त्यांनीं जिवाचं बरं वाईट केलं नव्हतं. आज नाहीं उद्यां तपास लागेल. ते भेटतील. अशी सर्वांनाच आशा होती. कदाचित् आपण होऊन परत येतील ? मनाची समता एकाएकीं ढळून त्यांनीं अविचारानं कांहींतरी केलं असेल पण मग माझी आठवण होऊन माझं प्रेम आठवून—माझं मन त्यांना ओढील. त्यांतून मी आजारी—महिने भरत आलेले.

* * *

एक वर्ष झालें. पण वासुदेवरावांचा पत्ता नव्हता. गंगूला मुलगा झाला. त्याचें नांव रामचंद्र. १० महिन्यांचा झाला तरीही चार महिन्यांच्या मुलाएवढा दिसे.

एके दिवशीं ती रामचंद्राला दूध पाजीत बसली असतां "श्री गुरुदेवदत्त" असा आवाज ऐकूं आला. ती आंत होती. दुसऱ्याच कोणीं भिक्षा घातली.

बोंडलें खालीं ठेवून व वांकून तिनें खिडकीच्या गजांतून पाहिलें.

‘ तो ’ पाठमोरा होता. तोच तो असेल किंवा दुसरा कोणी असेल. मागून ओळखत नव्हतें. पण तिच्या विचारांना चलन देण्यास तेवढें निमित्त पुरे होतें.

“ अरेरे ! त्यानं लग्न मोडून फसवलं आणि यांनीं लग्न करून फसवलं. लग्न मोडून तो बचावला आणि हे लग्न करून फसले. काय दैवाची विचित्र लीला ! त्याच्याशीं लग्न झालं नाहीं म्हणून मला किती आनंद झाला. मी देवाचे किती आभार मानले. कदाचित् लग्न झालंच असतं तर त्यानें संसारही थाटांत केला असता. नाहींतरी आतां-सारखंच झालं असतं. मग त्याच्याशींच लग्न झालं असतं तर कुठें बिघडत होतं ? यांच्या मागें मला तरी जगून काय करायचं—पण हा पोटचा गोळा आहे ना ! मलाही त्यांच्यामागें झोळी घेऊन हिंडलं पाहिजे. असे विचार आले म्हणजे राग येतो. संन्यास घ्यायचा होता मग लग्न कशाला केलं ? हें सगळं ब्रह्मज्ञान आधीं नव्हतं का समजलं ? सगळीं सुखं असलीं म्हणजे देव आठवत नाहीं. संकटकाळीं देव आठवतो. हें स्मशान वैराग्यच म्हणावयाचं.

काय करूं ? असे विचार येऊन गेल्यावर माझं मलाच वाईट वाटतं. मी त्यांना किती टाकून बोलायची तरी ते प्रेमळपणेंच उत्तर देत. संन्यास घेतला तर हरकत नाहीं पण निदान मला तरी बरोबर न्यायची. म्हणजे पतीची आणि देवाची दोघांचीही सेवा घडली असती. या बाळाकडे पाहून जगावंसं वाटतं व त्याच्याचकडे पाहून काळीज चरकतं.

तिनें बाळाला घट्ट धरलें, कुरवाळलें, त्याचे पापे घेतले, व मग पोटभर रडली.

* * *

याही गोष्टीला तीन-चार वर्षे होऊन गेलीं.

एके दिवशीं आपले रामदासीबुवा भिक्षा मागण्याचें आटोपून त्वरेनें आपल्या मकाणाकडे परत चालले होते. समोर त्यांना एक जरा विचित्र दृश्य दिसलें. म्हणून ते तिकडेच पाहूं लागले.

एक संन्यासी फुटपाथवरून चालला होता. व त्याच्या अगदीं जवळून एक दक्षिणी बाईही चालली होती. तिच्या खांद्यावर एक तान्हें मूल होतें व जवळून पांच-चार वर्षांचा एक मुलगाही चालत होता. ती मुलं कोणाचीं ? असेल एखादा ‘ बोकेसंन्याशी ’ ?

ते इतके लागून जात होते कीं, त्यांचा संबंध असावा असें वाटत होतें. तो तर संन्यासी. मग त्याचा ह्या बाईशीं काय संबंध ?

कदाचित् चुकून जवळून जातांनाच आपल्याला दिसले असतील ? रस्त्यांत माणसाला माणूस लागतं केव्हां. तो पहा—फूटपाथवरून उतरला. ती लेकुरवाळी तशीच पुढें चालली; नाहीं, त्यांचा संबंध नाहीं. तो पहा मुलगा एका हात-गाडीजवळ थांबला. तीही थांबली. संन्यासी पुढेंच गेला; उगीच शंका आली.

पण शंका नव्हती. संन्याशानें मागें वळून पाहिलें, तो थांबला. सर्वच पुढें चालूं लागलीं. तो फुटपाथच्या खालून चालला होता. ती लेकुरवाळीही खालून जाऊं लागली. तो फुटपाथवर चढला—तीही चढली. रस्ता ओलांडून तो पलिकडच्या फुटपाथवर चढला. तीही गेली. पुन्हा जवळ आले, त्याला कोणीतरी भेटलें, तो थांबला. जरा पुढें जाऊन तीही थांबली. छेः ! शंका नाहीं; ते नवरा—बायकोच. तीं त्यांची मुलं. हा ‘ बोकेसंन्याशाचा ’ मूर्तिमंत संसारच फुटपाथवरून चालला होता !

रामदासीबुवा झपकन् त्याच बाजूनें पुढें निघून गेले. हा लेंकुर-वाळा संन्यासी कोठें तरी आपण पूर्वी पाहिला असावा असें बुवांना वाटलें; असेल एकाद्या यात्रेंत किंवा नदीच्या घाटावर किंवा देवळांत.

इतक्यांत त्या संन्याशाशीं बोलणाऱ्या गृहस्थानें त्याला डंवचून म्हटलें-" पाहिलेस का हे बुवा-आतां येथून गेले ते ?-ते-ते-पहा."

" का ? कोण ते ?-अरे हो-पाहिलं त्याला मी पूर्वी. " संन्यासी म्हणाला.

" अरे तो केशवराव रानड्या. चांगला खाऊन-पिऊन सुखी होता. इन्स्पेक्टर होता, एक्साईजमध्यें. पण बायको मेली, पोरगं गेलं. अन् त्याला विरक्ति आली. लग्नही करणार होता-ठरलं होतं-पण मोडलंन बेट्यानं ! आतां त्या आंधळ्या-पांगळ्याच्या संस्थेला सगळे पैसे घरदार देऊन टाकून स्वतः भिक्षा मागतो आणि त्या संस्थेंत फुकट काम करतो. हुषार आहे मोठा. बरं तर बरं-लग्न मोडलंन नाहीं तर त्या बिचारीचा-" तो पुढें कांहीं म्हणणार होता पण त्यानें अर्धवट जीभ चावली.

* * *

एका देवळाच्या आवारांतील पिंपळाच्या पारावर दोघे संन्यासी बसले होते.

एक दुसऱ्याला म्हणाला, " सगळे लोक सारखे नसतात ! त्याबद्दल मला आतां मनापासून वाईट वाटतं. बुवा, तुम्हीं क्षमा कराल ना ? "

दुसऱ्या संन्याशानें उत्तर दिलें, " क्षमा कसली ? तुम्ही म्हणतां तें खोटें नाहीं. या जगांत चोर आणि साव ओळखणं खरोखरच कठीण झालं आहे. सगळ्यांचे पोषाख सारखेच. तेव्हां माझ्याबद्दल तुम्हांला शंका यावी यांत आश्चर्य कसलं ? "

उलट पहिला संन्यासी म्हणतो, " मीच त्या दोषाला पात्र आहें. पहा, मी विरक्त होऊन बायकोला माहेरीं टाकली आणि रानांत गेलों. पण मन ओढ घेऊं लागलं. केली गोष्ट चांगली कीं वाईट याचाच निश्चय होईना. अशा अनिश्चित मनःस्थितींत परमेश्वराकडे तरी काय लक्ष लागणार ! मठांत गेलों. तीर्थक्षेत्रें हिंडलों. पण ' चीनांशुकमिव केतोः प्रतिवातं नीयमानस्य ' याप्रमाणें माझ्या मनाची अवस्था होती. संन्यासवृत्ति पत्करल्यानंतर आपल्याला शांति व सुख मिळेल अशी अपेक्षा असल्यामुळें त्या वृत्तीचा मला मोह पडला. म्हणजे मोहालाच अखेर मी बळी पडलों म्हणायचा. मग ज्याला मोहानं ग्रासलं आहे तो विरक्त कसचा ? विरक्ति आपो-आप आपण होऊन आली पाहिजे. आणून ती यावयाची नाहीं. व तसें करूं गेल्यास माझ्यासारखी त्रिशंकूप्रमाणें स्थिति व्हायची. कारण मला सांगायला शरम वाटते कीं, अखेर मीं आपल्या पत्नीची गांठ घेतली. पहिला मुलगा होताच, आतां तान्ही मुलगी आहे. मी जाऊन येऊन असतों. पुन्हा पहिल्याप्रमाणं संसार थाटून रहाण्याची तर लाज वाटते पण घराचा, पत्नीचा—मुलांचा मोह—माया तर आवरत नाहीं. काय करावं असं झालं आहे ! "

दुसरा साधु म्हणाला, " तुमची हकीकत ऐकून मला फारच वाईट वाटतं. प्रश्न आहे खरा. पण मला वाटतं एवीं तेवीं लोक हसल्या खेरीज रहाणार नाहींत. मग फिरून गृहस्थाश्रमांत यायला कांहीं हरकत नाहीं. किंबहुना न येणेंच वेडेपणाचें होईल. तुम्हीं कांहीं विधिपूर्वक संन्यास-दीक्षा घेतली नाहीं. कारण असं पहा, आतां धड स्वार्थ नाहीं धड परमार्थ नाहीं. अशी धुपाटण्यासारखी

अवस्था झाली आहे. यांत काय अर्थ आहे ? दुसऱ्या गांवीं—लांब—लांब जाऊन रहा आणि धर्मपत्नीसह सुखानं संसार करा. तिला दिलेलं वचन पाळा. तुमचे श्वशुर श्रीमंत आहेत म्हणतां—ते नोकरीही देतील. बळजबरीने वैधव्यांत ठेवणें यांत जसा धोका आहे तद्वतच भलत्या हट्टाला पेटून किंवा खोट्या अभिमानाला बळी पडून संसाराचा त्याग करणं ही खरी विरक्ति नव्हे. जगाला भिऊन—माफ करा—जगाला कंटाळून नव्हे, तर भिऊन तुम्ही पळालां. बायकोचं पोट कसं भरूं या विवंचनेनं या दुबळेपणामुळं तुम्ही भित्र्यासारखे रानात पळालां. येथेंच तुमचं चुकलं. ती खरी विरक्ति नव्हती. मनाला—विचाराला पटलं नव्हतं. आयत्या वेळचा तो मोह होता. स्मशानवैराग्य होतें. लग्न केल्यानंतरची जबाबदारी तुम्हांला झेपेनाशी झाली म्हणून तुम्ही पळ काढला. अर्जुनानें शस्त्र खालीं ठेवलें तें भिऊन नव्हे तर त्याला खरोखरच संहाराची खंत आली. सुखासुखीच्या परिस्थितींत जर विरक्ति आली तरच ती खरी. संकट आल्यावर कोणीही देवाचें नांव घेतोच. पण चांगल्या—उत्तम परिस्थितींतही देव आठवला तरच ती भक्ति. नाहींतर कामापुरता मामा. मला कांहीं कमी नव्हतें. मला मोठ्यांच्या मुली सांगून येत होत्या. पैशाला तोटा नव्हता. अशा परिस्थितींतही माझं मन एकदां विटलं ते विटलं. आणि म्हणूनच अद्याप मी आहें तसाच आहें. जगाला भिऊन मी रामदासी बनलों नाहीं तर स्वतःच्या स्वतंत्र इच्छेनें—जगांत मला 'राम' दिसेना म्हणून. अत्याग्रहास्तव ती मुलगी पाह्यला म्हणून गेलों पण तिच्याकडे मीं वर मान करून बघितलेंही नाहीं. मी तिला ओळखणारही नाहीं."

———

# तोफेच्या तोंडीं

"पि–पीं–पि प्, पि–पीं–पिप्"

हा खुणेचा शब्द ऐकतांच झटकन् टेलिफोनवरील लान्स-नाइकानें ऐकण्याच्या वाटया कानावर बसविल्या व पायाला बांधलेल्या बँडेजमध्यें खोंचून ठेवलेल्या कॉपीइंग पेन्सिलीच्या तुकडयानें तो निरोप उतरून घेऊं लागला. पण निरोप उतरतां उतरतां त्याची चर्या सारखी बदलत चालली. त्यानें उतरून घेतलेला निरोप उलट वाचून दाखवून खात्री करून घेतली व त्वरेनें ऑर्डर्लीला बोलावून व त्या चिठ्ठीवर 'ताबडतोब' अशीं अक्षरें लिहून ती त्याच्या हातीं दिली व 'डबल' करीत जा म्हणून बजावलें.

तो अत्यंत जरूरीचा निरोप कँपांतल्या कँपांतच कर्नलसाहेबांपर्यंत पोहोंचण्याच्या आधींच साऱ्या कँपांत बातमी पसरली कीं कोठल्याशा गांवच्या पोलिटिकल ऑफिसरच्या वाड्यावर बंडखोरांनीं रात्रीं छापा घालून त्याला ठार केला व त्याच्या बायकोला व कर्नलसाहेबांच्या बायकोला पळविलीं !

मेजर मुकुंदराव एम्. सी. यांना लढाईंतील अपूर्व कामगिरीबद्दल ब्रेव्हेट-कर्नल करून ओ. बी. ई. ही पदवी नुकतीच अर्पण करण्यांत आली होती. त्यांच्या कंपनीचे खरे सेनापति हॉस्पिटलमध्यें आजारी असल्यामुळें कर्नल मुकुंदरावांकडेच तिचें आधिपत्य आलें होतें. त्यांच्या कंपनीबरोबर दोन तोफा, एक मशीनगन्, वायरलेस सेक्शन व सॅप-

न्याची एक तुकडी वगैरे वगैरे देऊन या दिशेकडे शत्रूचें पारिपत्य करण्यास पाठविलें होतें. यामुळें ही लहानशी ब्रिगेडच शोभत होती. मजल दरमजल करीत त्यांची ब्रिगेड आग्नेयेकडे शत्रूला हांकलीत चालली होती व तिकडून येणाऱ्या दुसऱ्या एका ब्रिगेडला जाऊन मिळण्याचें त्यांचें ध्येय होतें. प्रतिकार झाला तरच शत्रूवर गोळीबार करायचा असा हुकूम होता. आतांपर्यंत तर यशस्वी रीतीनें व विशेष लोक कामास न येतां प्रांत काबीज करीत व ठाणीं बसवीत ते चालले होते. वैभवाच्या शिखरापर्यंत ते येऊन पोहोंचले होते.

तोंच तो भयंकर टेलिफोनचा निरोप त्यांनीं वाचला. तो पाहून त्यांना काय वाटलें असेल याची कल्पना करवत नाहीं. शत्रूनें बायको पळवून नेली ! त्यापेक्षां मारून टाकली असती तरी बरें ! कदाचित् मारलीही असेल. आणि त्याहीपेक्षां पलीकडे—!

नको ! तो विचारच नको ! संशायास्पद परिस्थितीपेक्षां मन खाणारी अशी भयंकर स्थिति कोणतीच नाहीं ! शांत पण धडाडीच्या वृत्तीचा शिपाईगडी मी ! पण या बातमीनें मी अगदीं हताश होऊन गेलों आहे; काय करावें समजत नाहीं. मन तळमळत आहे. कोठें नेली, कशी नेली, काय नेली ! आतां ती कोठें असेल? आधीं असेल काय ? कीं ही सगळी ब्रिगेड घेऊन तिकडेच मोर्चा फिरवूं ?—पण तिकडे कुठें ? आणि—काय मी वेडा—मी घरचें काम करतों आहे का, मनाला वाटेल तिकडे सैन्य न्यायला ? अरेरे ! काय माझें मन बावरलें आहे.

कर्नल साहेबांच्या मनांत एखाद-दुसरा विचार आला असता तर तो विशद करून सांगणें शक्य होतें. पण एक ना दोन, हजार विचार

त्यांच्या मनांत आले. पण इतक्यांत स्टाफ ऑफिसर आल्याची वर्दी आली. कारण ' स्टँड टू ' ची पहाणी करण्याची वेळ झाली होती.

कर्नलसाहेबांना जर एकटेच विचार करीत बसण्याची सवड असती तर विचार कर-करून ते खास वेडे झाले असते. पण कांहीं ना कांहीं काम सारखें त्यांच्यामागें होतें. अखेर जेवायची वेळ झाली. पण तोंड धुण्यास ते उठेनात. त्यांच्या ऑर्डर्लीनें दोनचार वेळां त्यांना सुचविलें. पण त्यांचें तिकडे लक्षच नव्हतें. शेवटीं ' मला आज जेवायला येतां येत नाहीं याचें वाईट वाटतें ' असा मेसमध्यें निरोप पाठवून ते आपल्या तंबूत बसले. ऑर्डर्लीनें तेथेंच थोडें सूप आणून आग्रहानें त्यांना पाजलें व सांत्वनपर दोन शब्द बोलून व बाईसाहेबांचें थोडें गुणवर्णन करून तो तंबूबाहेर जाऊन विडी पीत बसला.

आपल्या अज्ञात स्थितींत असलेल्या पत्नीबद्दल विचार करण्यास कर्नलसाहेबांस फारच थोडी फुरसत होती—ऑफिसरांचें जेवण होई-पर्यंत. कारण भोजनोत्तर उद्यांचा कार्यक्रम मुक्रर करण्याकरतां सर्व मुख्य हपीसरांची सभा होती.

साहजिकच त्यांना पुष्कळशा पूर्वींच्या गोष्टींचें व प्रसंगांचें स्मरण झालें. अरेरे ! आपण कोणीकडून बायकोला बरोबर घेऊन आलों असें त्यांस झालें. त्यांचें लग्न अगदींच सहज—सोप्या रीतीनें झालें होतें. म्हणजे सतराशें मुली त्यांना पहाव्या लागल्या नव्हत्या. विलायतेस सँडहर्स्ट कॉलेजांत जाण्यापूर्वींच त्यांचें लग्न करून ठेवावें असा जरी विठ्ठलपंतांचा—मुकुंदाच्या वडिलांचा मानस होता तरी मुकुंदाचा हट्ट लग्नच न करण्याचा होता. कारण लढवय्या गड्याला कशाला पाहिजे बायको, तरवार हीच त्याची बायको असें तो म्हणे !

पट्‌कन लढाईंत केव्हां तरी मरून गेलों तर त्या बिचारींनें काय करावें ! सँडहर्स्ट कॉलेजांतून चांगल्या रीतीनें पसार होऊन व सेकंड लेफ्टनंटचीं ' वस्त्रें ' घेऊन जेव्हां तो परतला, व आपल्या बरोबरीच्या सोबत्यांचीं व अनेक सेनानायकांचींही लग्नें झालेलीं आहेत असें त्यानें पाहिलें, तेव्हां तरवारीच्या धारेवरच अवलंबून रहाण्याचा त्याचा विचार डळमळूं लागला. पूर्वींच्या सर्व योद्धयांना बायका होत्या, इतकेंच नव्हे तर ते त्यांना आपल्या छावणीबरोबरही नेत असत. किंबहुना, बायका नसल्या तर युद्धाचेंही फारसें कधींच कारण पडणार नाहीं ! तरवारींत आणि बायकोंत पुष्कळसें साम्य असतें खरें, —म्हणजे दोघीही गोऱ्या, तीक्ष्ण व पाणीदार असून आपल्या वामभागीं नेहमीं असतात, त्यांना म्यानांत अगर गोषांत ठेवून जपावें लागतें, प्राण जाईपर्यंत त्यांना दुसऱ्याच्या हातीं जाऊं द्यावयाचें नसतें, किंवा त्यांना विसंबायचें नसतें, दोघींशींही धर्मानें वागावयाचें असतें, दोघीही आपल्या कुलाला भूषण आणणाऱ्या असतात. पण येथें त्यांचें साम्य संपतें. बायको आणि तरवार यांच्यांत विरोधही त्यांच्याइतकाच तीक्ष्ण आहे. बायको सजीव असून नवऱ्याला धारेवर धरते व उद्योगी करते तर तरवार निर्जीव असून दुसऱ्याला तशीच करते; बायको आपली सेवा करते तर तरवारीची सेवा आपल्यालाच करावी लागते, बायको आपल्याला पाणी आणून देते तर तरवारीलाच आपल्याला पाणी द्यावें लागतें; परपुरुषाकडे बायको पहातही नाहीं, तर तरवार सदा परपुरुषांच्या गळ्यांत पडते. सत्याकरतां बायकोची मदत लागते तर असत्याकरतां तरवारीचा उपयोग करायचा असतो. बायको आपली वंशवृद्धि करते तर तरवार दुसऱ्याच्या कुलक्षयाला कारणीभूत होते.

बायको आणि तरवार यांमध्यें थोडें साम्य असलें तरी इतकें अंतर असतां तरवारीला बायकोची उपमा देणारा कवि अप्रबुद्ध असला पाहिजे. पूर्णोपमा नसली तरी ढोबळ गोष्टी तरी जमल्या पाहिजेत. नाहीं तर शेंडीदेखील बायकोप्रमाणेंच नेहमीं जवळ असते व आपल्या डोक्यावर नाचते, म्हणून काय शेंडीवाल्यांनीं अविवाहितच रहायचें ? तेव्हां मनाजोगी बायको मिळाल्यास लग्न करावयाचें असें मुकुंदानें ठरविलें. तरी पण त्या वर्षींच नको असा त्यानें आग्रह धरला होता. कारण त्याच्या सैन्यांतील आयुष्याला नवीनच सुरुवात होती व अजून त्याचा निश्चित जम बसला नव्हता.

एके दिवशीं त्याची व चिमणाताईची समाईक मित्राचे घरीं चहापानप्रसंगीं गांठ पडली. किंवा त्यांची त्या मित्रानें मुद्दाम गांठ पाडली. तेव्हांपासूनच ती त्याच्या मनांत भरली.

विठ्ठलपंतांचें आतां उतारवय झालें होतें व यापुढें मुकुंदाचें लग्न लांबवायचें नाहीं असा त्यांनीं निश्चय केला. एक मुलगी दाखवायला आणायचें ठरलें. ही बातमी मुकुंदाला लागतांच त्यानें आक्का ( थोरल्या बहिणी ) करवीं वडिलांना स्पष्ट कळविण्याचें ठरविलें कीं मी यंदा लग्न करणार नाहीं. पण त्याचा हा निरोप कळविण्यास कोणीच तयार होईना. याची गुणगुण वडिलांपर्यंत गेली. सर्व लोक खट्टू झाले, आई रडूं लागली व वडीलही म्हणाले कीं ‘ बरें बाबा, आम्ही मेल्यावर तरी करशील ना ? सूनमुख व नातवंड पहाण्याकरतांच आम्ही जिवंत राहिलों आहों, नाहींतर आतां जगून काय करायचें आहे ? पुष्कळ मुली झाल्या, कार्यें झालीं, तुला एवढें शिक्षण दिलें, संपलें. आतां जातों बाबा आम्ही काशीयात्रेला, व पुण्यगंगेंत अखेरची

समाधि घेतों—किंवा आम्ही मेल्यावर तरी कशाला करतोस? सगळ्या मुलीच झाल्या, एवढाच मुलगा—म्हणून आमचे घोडे गंगेला न्हायले, पण तो आनंद व्यर्थच ठरला. हीही मुलगीच झाली असें समजूं म्हणजे झालें.' असें म्हणून म्हाताऱ्यानें डोळ्यांना धोतराचा पदर लावला व तो माडीवर निघून गेला. मुकुंदाजवळ कोणीच येईना. तो एकटाच विचार करीत राहिला. दुसऱ्या दिवशीं पुन्हा गोष्ट निघाली, तेव्हां मुकुंद एका अटीवर लग्नाला कबूल झाला. लग्न करायचें तर चिमणाताईशींच करावयाचें असें आपलें मनोगत त्यांनीं आक्काजवळ प्रकट केलें. 'वा:,' त्या म्हणाल्या. 'मग जमलेंच म्हणायचें. काल मुलगी दाखवायला आणायची ठरलें होतें, तीच ती!'

झालें. लग्न ठरलें. चिमणीच्या आठवणीनें मुकुंदाला असें झालें कीं केव्हां एकदां लग्न होतें. फार लांबचा मुहूर्त त्याला आवडला नाहीं. कारण त्याला फार रजा नव्हती!! चिमणी त्याच्या अगदीं मनाजोगी बायको होती. तरवार-बिरवार तो सगळें विसरला. लढाईत पटकन् न मरण्याचा त्यानें निश्चय केला. तरवारीचा सध्यां उपयोग लांबचा मुहूर्त सांगणाऱ्या भटजींवरच!

चिमणी त्याला हवी होती तशी मुलगी होती. दिसण्यांत दहाजणींसारखी व निमगोरी तरी उंच व धिप्पाड. खेळांत ती प्रवीण होती. आट्यापाट्या, खो-खो, हुतुतू, बॅडमिंग्टन वगैरे खेळांतील प्राविण्याबद्दल तिला कांहीं बक्षिसेंही मिळालीं होतीं. या खेळण्यामुळें तिचा आधींच निमगोरा असलेला वर्ण लालसर काळा झाला होता. विडा खाल्ला तर गळा लाल दिसणारी राजकन्या ती नव्हती. लष्करी आयुष्याच्या धगींत अशी मेणाची बाहुली टिकणें शक्य नव्हतें.

लष्करी ऑफिसरला चिमणीसारखी सुदृढच बायको पाहिजे. कारण आतां लग्न करण्याचें मुकुंदानें ठरविलें एवढेंच नव्हे तर लवकर लग्न करून बायकोला स्वारीवर घेऊन जाण्याचें त्यानें मनांत योजिलें.

मुकुंदाला लग्नाचें कोडें पडण्याचें आणखी एक कारण होतें. पण तें त्यानें कोणाजवळ बोलून दाखविलें नव्हतें. पूर्वी सिमल्यास शिकत असतां एका काश्मिरी ज्योतिषानें त्याच्याविषयीं असें भविष्य केलें होतें कीं, हा आपली बायको खाणार! पण आजपर्यंत अनेकांनीं अनेक भाविष्यें वर्तविलीं असल्यामुळें साहजिकच इतर भविष्याप्रमाणें हेंही भाविष्य मुकुंद सध्यां विसरला होता. एकादी जोराची लाट आली म्हणजे किनाऱ्यावरील वाळूंतील शिंपले वगैरे दिसेनासे होतात व लाट ओसरली कीं ते पुन्हा दिसूं लागतात. तद्वत् लग्न ठरण्याच्या आनंदातिशयांत तो तें भविष्य विसरला होता. पण सुखाचा लोट ओसरल्यावर अकस्मात् त्याला तें भविष्य आठवलें. त्या फुटक्या शिंपल्या व माशांचीं हाडें सरसर सरकलेलीं ऐकूं आलीं.

हेंच भविष्य त्याला आज अगर काल कोणीं सांगितलें असतें तर त्यानें लग्न ठरवण्यापूर्वी पुन्हा एकदां नीट विचार केला असता. पण तें भविष्य सांगितल्याला आतां पुष्कळ वर्षें होऊन गेलीं होतीं. जणुं काय पूर्वीचें भविष्य शिळें-ग्रहण करण्यास अयोग्य होतें! भविष्यावर त्याचा विश्वास नव्हता खरा, पण आपल्यावर बेतली म्हणजे मन कचरतें इतकेंच; शिवाय, हा अमकीच बायको खाणार असें विधिलिखित नसून ह्यानें कोणतीही बायको केली तरी तिला खाणार असें होतें. म्हणजे लग्नच करणें नको!

का, आतां नकोच लग्न! एके काळीं मुकुंदाची विचारसरणी

अशी होती कीं मी उद्यां फट्दिशीं मेलों तर तिनें काय करावें ? व म्हणून तो लग्न नको म्हणत होता. आतां, लग्न झाल्यावर मी तिला खाणार, मग ग्यां बिचाऱ्यानें काय करावें, असाच प्रश्न त्याला पडला. चिमणी किती जरी राकट, कणखर, खेळाडू असली तरी अबलाच. तिच्याशीं लग्न करणें म्हणजे तिला फांस घालणेंच आहे. माझ्या लढवय्याच्या हातून बायकोला खाण्याचाच का पहिला पराक्रम होणार ? तिच्याशीं लग्न करणें म्हणजे गाय विकत घेऊन गुबगुबीत करून तिचा हलाल करणेंच नाहीं का ? हिच्याशीं लग्न करणें म्हणजे हौसेनें दिवाळींतील किल्ला मांडण्यासारखें झालें. आपल्याच हातांनीं तो लागलीच मोडायचा असतो !

कर्नलसाहेब तंबूंत एकटेच बसून विचार करीत असतां त्यांना आणखी किती तरी गोष्टी आठवल्या. तें भविष्य आपण विसरलों असलों तरी आकाशांतील ग्रह कसें विसरतील ! आणि त्यांनींच हा डाव साधलेला दिसतो आहे. काय करावें त्यांना सुचेना. टेलिफोननें आणखी कांहीं निरोप आल्यास ताबडतोब थेट आमच्याकडे पाठवून देण्यास सांग, असा त्यांनीं ऑर्डर्लीला हुकूम केला व लगेच वेळ झाल्याबरोबर हपीसरांच्या सभेकरतां उठून ते मेस्च्या तंबूंत गेले.

आजची हालहवाल, उद्यांचा कार्यक्रम, इत्यादि विषयांचा खल चालला होता. इतक्यांत एक ऑर्डर्ली मोजून पावलें टाकीत आंत आला. खट्दिशीं बुटाच्या टांचा एकमेकांवर आपटून ताठ उभा राहिला व उजव्या हातानें अस्सल लष्करी सलाम करीत म्हणाला, " अड्जूटण जमादार साब सलाम देता है साब, " असें म्हणून व पुन्हा पहिल्यासारखाच सलाम करीत शास्त्रीय ' अबाउट टर्न ' करून कनातीतील ठेंगण्या दरवाजांत वांकून बाहेर पडला.

नंतर जमादारसाहेब वांकून आंत गेले. त्यांनींही सलाम केला व कपाळावरचा हात सपकन् खालीं करून आपल्या कोटाच्या खिशावर जोरानें आपटला, व म्हटलें कीं, पिकेटच्या बाहेर बारा इसम पांढरें निशाण घेऊन आले असून जनरलसाहेब बहादुरांशीं आपल्याला कांहीं बोलावयाचें आहे असें म्हणतात. त्यांतील एकजण आपण पलीकडच्या टेंकडीवरील गांवच्या शेखचा वकील आहे असें म्हणतो. हुकूम होईल तसें करतों.

थोडा वेळ खलबत होऊन त्या वकीलाला येऊं देण्याचें ठरलें. बरोबरच्या दुभाषाला ताबडतोब हजर होण्याचा हुकूम झाला.

वकीलसाहेब असें बोलणें लावण्याकरितां आले होते कीं कर्नल-साहेबांचें सैन्य उद्यां दक्षिणेकडे कूच करीलच. तर त्यावेळीं त्यांनीं आग्नेयेकडील टेंकडीवर असलेल्या आपल्या गांवावर गोळीबार करूं नये. केला तर त्याचा परिणाम फार वाईट होईल, अशीही त्यांनीं धमकी दिली. तुमच्या धमकीला भीक घालणारा मी नव्हे असें कर्नल साहेबांनीं चोख उत्तर दिलें. जरूर तर अलबत् गोळीबार करीन. तुम्ही आमची वाट रोखूं लागलां तर तोफासुद्धां सोडीन.

वास्तविक वकीलसाहेबांच्या शेखाचें हें टेंकडीवरील खेडें आड-वाटेला व आग्नेयेकडे लांबच होतें. त्यावर गोळीबार करण्याचें अगर तें हस्तगत करण्याचें सध्यां कारण नव्हतें. शिवाय म्हणण्यासारखी शत्रूंची संख्याही तेथें नव्हती. त्या शेखानें आपण होऊन कुरापत काढली नाहीं तर त्या टेकडीच्या वाटेस जाण्याचें प्रयोजन नव्हतें. पण वकीलाला तसें उगीच सांगून टाकण्याचेंही कारण नव्हतें. पण त्या शेखाला मात्र अशी भीति असावी कीं आपल्या गांवावर यांचा रोख येणार व म्हणूनच त्यानें वकील पाठविला.

कर्नलसाहेब ऐकत नाहींत असें पाहून वकीलानें दुसरा डाव टाकून शह दिला. तो म्हणाला, " कर्नलसाहेब, विचार करा. मी तुम्हांला आगाऊ सूचना देऊन ठेवीत आहें. नाहींतर मागाहून आम्हांला रानटी, अशिक्षित अशीं तुम्ही लोक विशेषणें लावाल. कारण एक जरी शिसाचा तुकडा तुमच्या छावणींतून आमच्या गांवाकडे आला तरी तुमच्या सर्व कैद्यांना—"

कैदी हा शब्द ऐकतांच कर्नलसाहेब मनांत बिथरले. पण त्यांनीं तसें दिसूं दिलें नाहीं.

वकीलसाहेबांनीं पुढें म्हटलें कीं, " एक गोळी जरी आमच्या बाजूला आली तरी तुमच्या सर्व कैद्यांना जबरीनें बाटवूं, अगर त्यांना गोळी घालून ठार करूं किंवा अन्य रीतीनें त्यांचे हालहाल करून मारूं. "

कर्नलसाहेब अशा धमकावण्यांना दाद देणारे नव्हते खरे, पण कांहीं एक कल्पना त्यांच्या मनांत आली व किंचित्काल ते विचारमग्न झाले. पण लगेच ते म्हणाले, " आमच्या कैद्यांच्या केंसाना हात लागण्यापूर्वीच मी तुमची टेकडी सर करीन." पण हें ते वरवर बोलत होते यांत शंका नाहीं.

वकीलानें पुन्हा म्हटलें," मग तुम्ही कांहीं ऐकत नाहीं ? टेकडी सर करून जरी तुम्ही वर आलां तरी पहिलीं मढीं तुम्ही आपल्या कैद्यांचीच पहाल. तुमच्या हातून पहिल्यानें त्यांनाच मारवूं. आणि तुम्ही लोक ज्या अर्थी बायकांना विशेष मान देतां, त्याअर्थी त्यांतल्यात्यांत सर्वांच्या आधीं, जी बाई आमच्या कैदेंत आहे तिलाच अग्रपूजेचा मान देऊं."

बाई हा शब्द ऐकतांच मुकुंदरावांच्या अंगावर शहारे आले.

वकील पुढें म्हणाला, "ती बाई जर गोरी असती तर तिची आम्ही केव्हांच वाट लावली असती. अब्रूनिशीं ती आज जिवंतच नसती."

काय ? 'गोरी असती तर ?' अरेरे ! खास तीच. माझी चिमणीच ती !

पुन्हा वकीलसाहेबांचें चाललेंच होतें. "पण ती हिंदी म्हणून वांचली आहे. तिला आम्हीं ओलीस ठेविली आहे असें समजा. तुमची एक दुर्बिण जरी आमच्या गांवाकडे रोंखली गेली तरी ते सर्व कैदी—ती बाई—हीं तुम्हांला अंतरलीं असें समजा ! आणि शिवाय तुम्हीं टेंकडी सर करणें तर अशक्यच आहे."

कर्नलसाहेब मनांत अत्यंत नरमले होते, पण किंचित् ताठ्यानें उद्गारले, "माझ्या शक्याशक्यतेच्या गोष्टींची चर्चा करण्याचें कारण नाहीं. तुमच्या शेखांना सांगा कीं तुमचा निरोप पोंचला, पण तुमच्या कोणत्याही धमकावणीला आम्ही भीक घालीत नाहीं. आमच्या वाटेस गेलांत तर तुमचीं शंभर वर्षे भरलींच म्हणून समजा. व उलट माझा निरोप कळवा कीं, सात दिवसांच्या आंत जर आमचे कैदी त्यांच्या केंसासही धक्का न लावतां आपण होऊन परत आणून पोहोंचवले नाहींत तर जबरीनें तसें करावें लागेल. आणखी कांहीं सांगावयाचें आहे ?"

"आणखी कांहीं नाहीं, पण पुन्हा तेंच सांगतों, नीट ऐका. तुमचे कैदी व बाई सुरक्षित ठेवणें अगर त्यांचे हालहाल होऊन मरूं देणें तुमच्याच हातीं आहे. त्या कैद्यांना, त्या बाईला तुमच्याच हातून मरण हवें असलें तर खुशाल डागा आपल्या तोफा ! इजाजत. सलाम, सलाम !"

वर सांगितलेंच आहे कीं वस्तुतः या टेकडीवर विनाकारण गोळीबार करण्याचें कारण नव्हतें. त्या शेखानें जर या सैन्याची उद्यांची

वाट रोंखली तर अर्थात् तसें करणें भाग होतें. किंबहुना, तें ठाणेंच हस्तगत करून, तेथें खंदक खणून व कांटेरी तारा लावून एक छावणीही ठेवणें जरूर झालें असतें. पण त्या शेखाला कांहीं कारणानें वाटलें असेल कीं, आपल्या गांवावर यांचा हल्ला येणार, व त्याचा प्रतिकार करण्याची त्यांच्यांत त्या वेळीं तयारी नसल्यामुळें त्यानें वकीलाकडून त्या कैद्यांचा व त्या हिंदी बाईचा शह दिला असेल. तेव्हां, एकपरी बरेंच झालें. वकीलाकडून बातमी तर अनायासेंच लागली व आम्हीं गोळीबार केला नाहीं तर कैदी व त्यांत आपली बायको हीं जिवंत रहातील असें त्याच्याकडून आश्वासन मिळालें. आपल्याला उगाच गोळीबार करण्याचें कारणच नव्हतें. तेव्हां अनायासेंच सर्व संकट टळलें, असें मुकुंदरावांना वाटून एक प्रकारें आनंद झाला. त्यांना कितीदां तरी वाटलें, आपापसांतच कांहीं तरी तह करून आपले कैदी तेवढे सोडवून घ्यावे. किंबहुना थोडा कमीपणा पत्करूनही आपल्या बायकोला—लाडक्या राधेला—तेवढी सोडवून आणावी. मुकुंदरावांना असें वाटणें साहाजिक होतें. पण जनरल कमांडिंगनें असें करणें कमीपणा आणणारें होतें, कायद्याविरुद्ध होतें, आपापसांत तह करण्याची त्याला अखत्यारी नव्हती; असा दुर्बल व कर्तव्यमूढ मनुष्य जनरलच्या कामाला नालायक होता. कोणत्याही मराठ्याच्या बच्चाला ही कल्पनाच नामर्दपणाची होती ! बरें झालें, त्या वकीलानें आपण होऊन सांगितलें कीं तुम्ही आमच्या वाटेस गेलां नाहीं तर आम्ही पण तुमच्या वाटेस जाणार नाहीं. नाहीं तर ? नाहीं तर काय ? लाडक्या राधेला ते बाटवणार ! तिचे हालहाल करून—आणि इतकें आश्वासन देऊनही जर

त्या शेखानें आपली वाट रोंखलीच तर? तर आपल्याला जरूर तोफा डागाव्या लागणार. आणि त्याच तोफेनें माझ्या लाडक्या रा–! हाय हाय! तो विचारच दुःसह आहे. हा आपल्या बायकोला खाणार, हेंच भविष्य अखेर खरें ठरणार काय? मी आपल्या हातानेंच तिला मारणार काय? हर हर! कर्मानें तरी कसा विलक्षण घाट घातला आहे पहा! मी–माझ्या लाडक्या राधेचा पति–मी आपल्या हातानेंच तिला तोफेच्या तोंडीं देणार म्हणायचा! मीं गोळीबार केला तर शत्रूच्या हातून पण माझ्यामुळें तिला मरण येणार, किंवा माझ्याच गोळीमुळें ती मृत्युमुखीं पडणार! शत्रूच्या हातानें तिला मरण येणें बरें कीं माझ्याच हातानें तिचें बरें वाईट होणें बरें, असें विलक्षण कोडें मला पडलें आहे. नशिबा! तिचा अंतच व्हायचा तर यापेक्षां तिसरी एकादी युक्ति तुला सांपडणार नाहीं का? शत्रूच्या हातांनीं मेली तर स्वर्ग तरी तिला मिळेल. पण माझ्या हातून मरण येऊन तिला काय पुण्य लाभणार?....पण मी अशा अभद्र कल्पना मनांतच कां आणतों? कदाचित् तो शेख आमच्या वाटेस जाणार नाहीं व आम्ही पुढें निघून जाऊं आणि ती सुरक्षित राहील. हे शेख लोक जितके दुष्ट आणि हट्टी तितकेच अभिमानी व इमानी असतात. उद्यां काय तें दिसेलच.

कर्नलसाहेब एका स्ट्रेचरवर निजले होते, पण त्यांना झोंप कसची येते? कित्येकदां त्यांना वाटलें कीं आपण नकळत एकटेच उठावें व त्या टेकडीवर जाऊन तिला हरप्रयत्नानें सोडवून आणावी. एकदां अशीही कल्पना आली कीं मध्यरात्रीं हलकेच निवडक सैन्यासह जाऊन त्या गांवावर छापा घालावा व एकही गोळी न खर्चतां किंवा रक्ताचा

एकही थेंब न सांडूं देतां तें गांव काबीज करावें. पण त्यांना तसा हुकूम नव्हता व असें करणेंही शक्य नव्हतें. त्यांच्या सैन्याचा तळ इतक्या जवळ पडला असतां, शेखाचे लोक घोरत पडतील असें शक्य नव्हतें. या कल्पना म्हणजे मनाचा स्वैरसंचार होता. पत्नीप्रेमाच्या–मायेच्या–त्या लाटा होत्या. कर्तव्याच्या खडकावर आपटून त्या मोडून जात पण पुन्हा पुन्हा येत! रात्रभर त्यांना झोंप आली नाहीं. पुन्हा पहाटेसच कूच करावयाचें होतें; सकाळीं काय होतें याची ते अधीरतेनें वाट पहात होते.

पण पहाट झाली, सामानाची बांधाबांध झाली, तंबू उपटले, गाड्या भरल्या, खेंचरें लादलीं, घोड्यांवर जिनें चढलीं, तोफा जुंपल्या, खणलेले खंदक बुजवले व फॉल इन् होऊन ब्रिगेड चालूं लागली.

मुकुंदरावांचा जीव वरखालीं होत होता. टेकडीकडून गोळी येते कीं काय?

पण तसें कांहींच झालें नाहीं. टेकडीच्या बाजूनें एकही गोळी आली नाहीं. ब्रिगेड त्यांच्या गोळीच्या टप्प्याच्याबाहेर सुरक्षित निघून गेली. मधून मधून–मन वेडें म्हणून–दुर्बिण लावून मुकुंदराव त्या टेंकडीकडे पहात होते, पण त्यांची लाडकी राधा त्यांना कोठेंच दिसली नाहीं!!

राधा या वेळीं काय करीत असेल? मी तिच्या इतक्या जवळून जातों आहें असें तिला कळलें असेल का? पण कळलें नसलेलेंच बरें; काय तिच्या जिवाला यातना असतील कोण जाणे! कर्तव्यकर्मा-पुढें माझी तरी काय दीनस्थिति झाली आहे पहा! मी पुरुषासारखा

पुरुष, माझी धर्मपत्नी—आवडती राधिका शत्रूच्या हातीं, माझ्या इतक्या जवळ असून, मला तिला सोडविण्याची खटपट करतां येऊं नये, तिचें दर्शनही घडूं नये, तिच्याशीं दोन खुशालीचे शब्द बोलतां येऊं नयेत ! नवीनच लग्न झालें आणि ती आमच्या घरीं पाठराखीण घेऊन आली, तेव्हां देखील एकाच घरांत असून तिच्याशीं बोलायची मला चोरी वाटे; ती दिसावी असें वाटे, पण ती असेल त्या खोलींत जाण्यास लाज वाटे, पण त्या मूकवृत्तींतही आनंद भरला होता, ती आपण होऊन धरलेली लाजेची मूकवृत्ति होती. आणि आतां ? आतां नवराबायकोमध्यें कर्तव्यच आड येत आहे. पण या वेळीं माझें कर्तव्य तरी कोणतें ? लग्नाच्या वेळीं धर्मामध्यें मी तुला अंतर देणार नाहीं असें मी कितीदां तरी आपल्या तोंडानें वचन दिलें आहे. आतां तिला शत्रूच्या तावडींत ठेवून खुशाल पुढें चाललों आहें. देवा, या वेळीं मला जनरलचें धैर्य आणि लढवय्याची वृत्ति दे.

आजचें मुक्कामाचें ठिकाण फारसें लांब नव्हतें. कालची आग्नेये-कडे असलेली टेकडी आतां ईशान्येकडे राहिली. त्या टेकडीवरील गांवच्या बंदुकीच्या टप्प्याबाहेर खंदक खणून कँप बसविण्यांत आला.

रात्रीं कालच्याप्रमाणेंच कर्नलसाहेब स्ट्रेचरवर सिगारेट ओढीत निजले होते. कारण त्यांना दोन दिवस झोंप ठाऊक नव्हती. बाकीचे ऑफीसर गाढ निजले होते. इतक्यांत एक ऑर्डर्ली लगबग आला व लष्करी सलाम करून त्यानें बिनतारी तारायंत्रानें आलेला निरोप, कर्नलसाहेब जागे आहेत असें पाहून त्यांनाच दिला व तो हुकुमाची वाट पहात उभा राहिला.

" काय वाटेल तें करून ईशान्येकडील खमाझिआ टेकडी सूर्यो-दयाच्या आंत सर करा. ही टेकडी पडल्याचें कळवा. गांव टेकडीवर

असल्यामुळें तोफांचा मुबलक उपाय करावा लागेल. विमानें रवाना झालीं आहेत, तीं तुमच्या छावणींत पहाटेसच तोफेचे गोळे खालीं टाकतील. त्वरा करा!" हाच तो संदेश.

खमाझिआ टेकडी म्हणजे जीवरील किल्ल्यांत राधा अडकली होती तीच. कमांडर-इन्-चीफचा तो हुकूम अचुक बजावला गेलाच पाहिजे. तोफेचा शेवटचा गोळा उडवीपर्यंत, ऑर्डनन्समधील शेवटची गोळी संपेपर्यंत, शेवटचें खेंचर किंवा शिपाई जिवंत असेपर्यंत लढलें पाहिजे.

आतांपर्यंत कितीदां तरी मुकुंदरावांना वाटलें होतें कीं अवचित् रात्रींच त्या टेकडीवर छापा घालून पत्नीला सोडवावी. पण तें शक्य नव्हतें. एक तर तें त्यांच्या कामगिरीबाहेरचें होतें. व छापा घालणेंही यशस्वी झालें नसतें. एक गोळी सोडली तर कैदी मृत्युमुखीं पडणार होते. या क्षणापर्यंत सुदैवानें सर्वच अरिष्टें टळलीं होतीं. पण आतां हा तोफा डागून टेकडी घेण्याचा हुकूम. काय करावें? इतर विचार करण्याची ही वेळ नव्हती.

त्यांनीं ताबडतोब आपल्या स्टाफ ऑफिसरला उठविलें. पांच मिनिटांत सर्व ब्रिगेड खडबडून उठली. शिपाई लोकांत नाना तर्क-वितर्क सुरू झाले. जमादार लोकांत कुजबुज सुरू झाली.

टेकडीच्या प्रदेशाची व आसपासच्या टापूची पहाणी करून, पुढचा सर्व कार्यक्रम आंखून व जरूर ते हुकूम देऊन आणि निरनिराळ्या पथकांच्या कमांडिंग ऑफिसरांना त्यांचीं कामें समजाऊन सांगून कर्नलसाहेब पुन्हा स्ट्रेचरवर जाऊन सिगारेट ओढीत बसले.

उद्यांच्या मोहिमेंत पुष्कळच अडचणी होत्या. एक तर अंधार असल्यामुळें टेकडी दिसणार नव्हती. वाटेंत एक नदी होती. व त्या टेकड्यांची दिवसाउजेडीं नीट रेंज घेऊन ठेवलेली नव्हती. ईशान्यदिशेकडे आभाळाच्या आड एक उंच टेकडी दिसत होती, पण ती छावणीपासून

नक्की किती लांब आहे हें नकाशावरूनच ठरवावयाचें होतें. तोफेचे गोळे अपुरे होते व विमानें वेळेवर आलीं नाहींत तर पंचाईत होणार होती.

जनरलसाहेबांच्या दृष्टीनें क्षुल्लक पण मुकुंदरावांना अत्यंत महत्त्वाची अशी एक अडचण होती. आपल्याच हातानें ते पत्नीला तोफेच्या तोंडीं देणार होते ! मनाचा त्यांनीं धडा केला, देवाची करुणा भाकली, राधेची क्षमा मागितली व यापुढें ती गोष्ट मनांतच आणावयाची नाहीं असा निश्चय करून टेकडी सर करण्याकरतां त्यांनीं कंबर बांधली.

उत्तररात्र झाली. कार्यक्रमांत ठरल्याप्रमाणें सर्व कँपांत बांधाबांधी सुरू झाली. तोफा जोडल्या व त्या टेकडीच्या दिशेनें रोंखून ठेवल्या. जी तोफ आज मुख्य तट पाडील, तीच कदाचित् राधेचा बळी घेईल. जी तोफ आज जनरलला वैभवशिखरावर बसवील तीच कदाचित् त्यांच्या पत्नीला मातींत मिसळून टाकील. जी तोफ शत्रूंचा बींमोड करील तीच मित्रापेक्षांही प्रिय असलेल्या एका मनुष्याचा जीव घेईल. यापैकीं कोणती तरी तोफ या गाडीवरील कोणत्यातरी गोळयानें आपल्या पत्नीचें शरीर छिन्नभिन्न करणार ! तो गोळा कोणता ? हें जर त्यांच्या भविष्याप्रमाणें आधींच कळेल तर तेवढा उचलून घेऊन खंदकांत पुरून टाकतां आला असता, किंवा त्याला भोंकें पाडून पाण्यांत भिजविला असता ! अगर तेवढयाच गोळयाचा नेम चुकवला असता. परीक्षेंत कोणता प्रश्न येणार हें अगोदर कळलें तर तेवढा घोकून तोंडपाठ करून ठेवला असता, अशी आशा करण्यासारखेंच हें वेडेपणाचें पण मनांत आल्यावांचून न रहाणारें होतें.

टेकडी सर करण्याकरितां ते जों जों अधिक नेटानें प्रयत्न करणार होते, तों तों त्यांची पत्नी त्यांच्याच गोळीबारानें कामास येण्याचा संभव वाढणार होता. लग्नाला अंतरपाटामागें उभी राहिली असतां मंगल अक्षतांचा मारही सहन न झाल्यामुळेंच कीं काय जिनें मान

खालीं घातली होती ती आतां किल्ल्याच्या भिंतीच्या आंतून अमंगल गोळ्यांचा वर्षाव कसा सहन करणार !

मुकुंदरावांच्या मनांत पुन्हा एकदां अशी कल्पना आली कीं आपल्या विश्वासू नोकराबरोबर एक दोन शिपाई अंधेरांतच पाठवून किल्ल्यावरील कांहीं खबर मिळाल्यास—व साधल्यास आपले कैदी तेवढे सोडवून आणण्यास गुपचिप पाठवावे. पण अलीकडच्या युद्धशास्त्राला असल्या गोष्टी साधारणतः संमत नाहींत. आतां राधेचा जीव खात्रीनें वांचविणें शक्य नव्हतें. आपण टेकडी सर करूं तेव्हां तिच्या ठिकऱ्या झालेल्यादेखील दृष्टीस पडणार नाहींत; किंवा कदाचित् ती मूर्तिमंत जिवंतही भेटेल. राधेचें काय होणार ? राधेचें काय होणार ! तिचें काय होणार ! !

कार्यक्रमांत ठरलेली तोफा डागण्याची वेळ जवळ जवळ येत चालली. तोफेच्या गाडीचीं चाकें थोडेसे चर खणून व अडण्या ठेवून घट्ट बसविण्यांत आलीं. निरीक्षणाकरितां केलेली उंच शिडी उभारून ठेवली. तोफेवरील पहारेकरी बंदोबस्तानें उभे होतेच. गनर लोक पट्टे सावरूं लागले. व तोफेचे भाग पुन्हा पुन्हा तपासून उगीचच पुन्हा साफसूफ करूं लागले. आर्टिलरीच्या मुख्य सार्जंटानें ‘ सर्व तयार आहे ’ असा रिपोर्ट कमांडिंग ऑफिसरला दिला, व ठरलेल्या वेळेपूर्वी पांच मिनिटें असतां कमांडिंग ऑफिसरनें ‘ सर्व तयारी आहे ’ असा स्टॉफ ऑफिसरला रिपोर्ट दिला. जनरलसाहेब जवळच होते, त्यांनीं तो ऐकला.

‘ सर्व तयारी आहे ! ’ कसली ? दहनाची ! ! बायकोला जिवंतपणींच मूठमाती देण्याची ! अग्निदिव्यच तें ! सीतेप्रमाणें ती याही दिव्यांतून वांचेल काय ?

‘ सर्व तयारी आहे, ’ कसली ! पाणी सोडून तर्पण करण्याची !

गोवऱ्या रचून अग्नि देण्याची ! प्रियपत्नीच्या अंगच्या चिंधड्या उड-विण्याची ! आपल्याच हातांनीं तिच्यावर तोफ डागण्याची.

तोफ उडेनाशी झाली तर ? गोळे जुने असल्यामुळें त्यांचा स्फोटच होईनासा झाला—ते फुसके ठरले तर ? रेंज चुकली तर ? देवाच्या मनांत राधेला वाचवावयाची असली तर त्याला पुष्कळ पळ-वाटा होत्या. ती हिंदी बाई राधा नसली तर ? किंवा असून ती अगोदरच लांब कोठें नेली असली तर ?

जनरलसाहेब स्टाफ् ऑफिसरबरोबर तोफेजवळ आले. इतरही कांहीं ऑफीसर तेथें मजा पहाण्यास जमले. ते सर्व जणूं काय ' पोहोंचवायलाच ' आले होते.

आर्टिलरीचा ऑफिसर त्या शिडीवर चढला व दुर्बिण रोखून सभोंवार बारीक नजरेनें पाहूं लागला. नंतर कांहीं एक निश्चय ठरवून व मनांत खाणाखुणा लक्षांत ठेवून तो खालीं उतरला व त्यानें जनरल वगैरे बरोबर थोडा वेळ कांहीं बोलणें केलें. नंतर तो पुन्हा वर चढला व दुर्बिणींतून पहात कोठें नेम धरावयाचा तें सांगूं लागला. " अगदीं उजवीकडचा मातीचा टॉवर. डावीकडे दहा डिग्री. पांच हजार पांचशें यार्ड. "

गोलंदाजांनीं हुकुमाप्रमाणें तोफेचें तोंड त्या दिशेला केलें व अंतर जमवलें. दुसरे गनर गाडींतून गोळा काढून हातांत धरून सज्ज झाले होते.

" चार्ज ! " शिडीवरील हपीसरानें हुकूम दिला.

गनरनीं गोळा आंत सारला, दार लावलें, स्क्रू बसविले.

जनरलसाहेब तटस्थपणें पहात होते. हाच गोळा कदाचित् तिच्या चिंधड्या उडवील ! हाच गोळा मला टेकडीची वाट व तिला स्वर्गाचें दार खुलें करून देईल.

शिडीवरील हपीसरानें एकदां खालीं पाहिलें, व सर्व तयारी आहे

व आपली रेंजही बरोबर आहे अशी खात्री करून लष्करी थाटांत एकदम हुकूम केला, ‘ फायर ! ’

मुकुंदरावांच्या पोटांत गोळा आल्याप्रमाणें झालें.

“ बँग ! ” असा भयंकर स्फोट झाला व सुई-सुई-सुई करीत गोळा मार्ग आक्रमूं लागला.

एक सेकंद—दोन सेकंद—जनरलसाहेब मनांत सेकंद मोजूं लागले. चवदा—पंधरा——

“ डूऽऽऽप ” तोफेचा गोळा कोठें तरी तीन मैलांवर पडला पण त्याचा स्फोट झालेला दिसला नाहीं, ऐकूं मात्र आला. तो त्या टेकडीच्या पलीकडे पडला असला पाहिजे. शिडीवरील हपीसरानें खट्टू होऊन दुर्बिण बाजूला केली. कारण जनरलसाहेब जवळ असतां अशी रेंज चुकणें त्याला कमीपणाचें वाटलें. पुन्हा त्यानें दुसऱ्या तोफेच्या तांड्याला हुकूम केला.

“ नंबर दोन. मातीचा बुरूज, डावीकडे पंधरा डिग्री, चार हजार पांचशें....चार्ज....फायर ! ”

बँग ! सूं-सूं—सूं—सूं—

साडेबारा सेकंदांनीं आवाज घुमला—डूऽऽऽप् ! त्या टेकडीच्या अलीकडील उतरंडीवर गोळा पडला.

“नंबर एक, तेंच लक्ष्य, बारा डिग्री डावीकडे, ४७००....फायर !”

तेरा सेकंदांनीं बरोबर टेकडीच्या माथ्यावर ढुऽम् ! असा आवाज करून गोळा फुटला व धुराचे काळे लोट उठलेले दिसूं लागले.

“ नंबर दोन, तेंच....फायर ! ”

इतक्यांत टेकडीवरून बंदुका झाडल्याचा आवाज ऐकूं येऊं लागला. फेरीवर फेरी झडल्या, पण त्यामुळें कांहींच नुकसान झालें नाहीं.

अर्धा तास तोफा बँग बँग करीत होत्या. अखेर टेकडीकडून येणाऱ्या गोळ्यांचा आवाज कमी कमी होऊं लागला व शेवटीं मुळींच बंद पडला.

पहाट झाली व झुंजूमुंजूं दिसूं लागलें. ब्रिगेड टेकडीच्या दिशेनें चालूं लागली.

पण हें काय ? अर्धवट अंधेरांत त्या टेकडीच्या अलीकडे ह्या उंचवट्यावर काय दिसतें ?—म्हणजे ? हेंच अलीकडील खमाझिआ गांव. आणि त्याच्यामागें दिसणाऱ्या टेकडीवर तोफा सोडल्या ! या अलीकडील टेकडीवरील लोक शाबूतच आहेत ? त्यांतच माझी पत्नी पण शाबूत आहे ! देवा, तुझी लीला अगाध खरी !

पण मग हे लोक गोळीबार कसे करीत नाहींत ? ते शरण येणार काय ? शाबास, मुकुंदराव ! तुम्हीं कामगिरी केली खरी. तुम्ही आतां निर्धास्त असा. तुमची आणि तुमच्या पत्नीची भेट होईल. तिला आतां मुळींच अंतर देऊं नका ! तिला बरोबर घेऊन मोहिमेवर घेऊन जाणार असलां तर निदान नेहमीं अगदीं आपल्याच छावणींत बाळगा आणि मोहिमेवर असूनही लांब ठेवणें भाग असलें तर रजपुतांप्रमाणें आधीं तिला मारून तरी टाका, म्हणजे असा विलक्षण प्रसंग तुमच्यावर पुन्हा कधींही येणार नाहीं !

सैन्य पुढें पुढें गेलें पण एकही गोळी आली नाहीं व ब्रिगेडची एकही गोळी खर्ची पडली नाहीं ! थोड्या वेळांत ते टेकडी चढूं लागले, तरी कोणी विरोध केला नाहीं.

विरोध केला नाहीं, पण मग पांढरीं निशाणेंही कोठें दिसत नाहींत ! मग काय, आम्ही वर चढल्यावर दबा धरून बसलेले लोक अवचित हल्ला करणार कीं काय ?

नाहीं. पुढें गेलेल्या हेरांनीं बातमी पाठविली कीं टेकडीवरील गांव ओसाड पडलें आहे. चिटपांखरूंही तेथें नाहीं.

त्या टेकडीवरील शेखाच्या गांवांत गोळी झाडायला कोणी नव्हतें, विरोध करायला कोणी नव्हतें, दबा धरून बसायला कोणी नव्हतें आणि शरण येण्यास पण कोणी नव्हतें. आदले दिवशीं रात्रींच सर्व लोक पलीकडच्या उंच टेकडीवर पळून गेले होते. आपल्या सैन्याला बिनतारी संदेश येण्यापूर्वींच त्या शेखाला ती बातमी कळली असावी व पलीकडच्या उंच टेकडीवर त्यानें पोबारा केला असावा. शिवाय खमाझिआ टेकडी आपण घेतली म्हणजे त्या पलीकडच्या उंच टेकडीवरून खमाझिआवर त्याला चांगलाच मारा करतां आला असता. पण अंधेरांत ती धाकटी टेकडी पलीकडच्या उंच टेकडीमुळें निराळी दिसली नाहीं व त्या उंच टेकडीवरच आपण मारा केला. उत्तर रात्रीं तोफा सुटल्याबरोबर त्यांनीं गोळीबार सुरू केला व त्याच्या आश्रया-खालीं ती उंच टेकडीही उतरून त्यानें एव्हांना कोठचा तरी पल्ला गांठला असावा. कारण त्या उंच टेकडीवरही स्मशानाप्रमाणें शांतता होती.

होय. त्या उंच टेकडीवर नुसती शांतता नव्हती, तर स्मशाना-सारखी शांतता होती. कारण त्या ठिकाणीं पुष्कळ मानवी शरीरें होतीं पण त्यांत जीव नव्हता! त्यांतील कांहीं शरीरें ओळखूं येण्या-सारख्या स्थितींतही नव्हतीं. आणखीही कित्येक शरीरें होतीं, पण तीं एकाच ठिकाणीं एकसमयावच्छेदेंकरून नव्हतीं. आणखीसुद्धां कांहीं देह त्या टेकडीवर असावेत पण त्यांचे ठिकरीठिकरी येवढाले अवयव कोठें पडले आहेत तें सांपडणें शक्य नव्हतें.

एक कोसळून पडलेलें घर होतें. त्याच्या ढिगाऱ्याखालीं एक गोंडस पण काळवंडलेला हात व मळलेले केंस दिसत होते. त्या हातावर मुकुंदरावांच्या सीलची चापटलेली आंगठी होती!

---